

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १९ वें ] मार्च १९६२ [ अंक ६



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.






प्राज्ञपाठशालामंडळ वाई, यांचें मासिक

# नवभारत

वर्ष पंधरावें | अंक साहावा | मार्च १९६२

संपादक-मंडळ

आचार्य **स. ज. भागवत**—प्रा. **वि. म. बेडेकर**—प्रा. **गोवर्धन पारीख** का. संपादक



**वार्षिक रु. ९** **सहामाही रु. ५** **अंकास रु. १**

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेंकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि. सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्. भीमरावबाडी, मुंबई २
फोन नं. २३५५४

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | |
|---|---|---|
| (१) धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | किंमत |
| साधी बांधणी | ... ... ... | ५२–०–० |
| कापडी बांधणी | ... ... ... | ६४–०–० |
| (२) धर्मकोश– उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| साधी बांधणी | ... ... ... | ११०–०–० |
| कापडी बांधणी | ... ... ... | १२६–०–० |
| (३) धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला | .... | ४५–०–० |
| (४) मीमांसादर्शन | ... ... ... ... | ३०–०–० |
| (५) मीमांसाकोश ... भाग १ ते ५ | | १६५–०–० |
| (६) कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश | ... ... | ६–०–० |
| (७) हिंदुधर्माची समीक्षा (लक्ष्मणशास्त्री जोशी) | ... | ५–०–० |
| (८) वैदिक संस्कृतीचा विकास | ... .. ... | ६–०–० |
| (९) नवमानवतावाद | ... ... ... ... | २–८–० |
| (१०) मानवाचा आदर्श | ... ... ... ... | ३–०–० |
| (११) चार्वाक– इतिहास आणि तत्त्वज्ञान (प्रा. सदाशिव आठवले) | ... | ३–०–० |
| (१२) गीता-प्रवेश (डॉ. गो. वि. देवस्थळी) | ... | २–८–० |
| (१३) छत्रपति संभाजी महाराज (श्री. वा. सी. बेंद्रे) | .... | १६–०–० |
| (१४) महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना (श्री. चा. अ. दाभोलकर) | .... | २–०–० |

# सार-संकलन

## प्रा. टॉने

प्रा. आर्. एच्. टॉने यांचें निधन हा समाजवादी आंदोलनाला बसलेला एक जबरदस्त धक्काच होय. रुग्णालयांत गेल्यानंतर अवघ्या आठ दिवसांतच त्यांनीं इहलोकीची यात्रा संपविली व त्यांच्या असंख्य चहात्यांना त्यांच्या आजाराचें व निधनाचें वृत्त एकदमच मिळालें! शारीरिक दुःखाची त्यांनीं अखेरपर्यंत कधींच पर्वा बाळगली नाहीं किंवा त्यांची मनःशांति त्यामुळें कधींहि ढळली नाहीं. ब्रिटिश समाजवाद त्यांच्या जाण्यानें एका अनन्यसाधारण विचारवंताला मुकला आहे. त्यांना श्रद्धांजलि वाहातांना दि. १९ जानेवारी १९६२ चा "न्यू स्टेट्स्मन्" लिहितो:

" टॉने यांच्या कार्याइतकाच, किंबहुना त्याहूनहि अधिक मोठा, त्यांचें प्रत्यक्ष जीवन हा आमचा वारसा आहे ही त्यांची खरी थोरवी. ते एक श्रेष्ठ इतिहासकार व निर्भीड सामाजिक टीकाकार तर होतेच; परंतु त्याबरोबरच चांगला समाज केवळ चांगलीं माणसेंच निर्माण करूं शकतील असा त्यांचा ठाम विश्वास होता. इतरांशीं वागण्यांत तो सिद्ध करण्याची ते सदैव तत्परता दर्शवीत. यामुळें समाजवादी आंदोलनांत त्यांना आगळेंच स्थान प्राप्त झालें होतें.

" कोणत्याहि मार्क्सवाद्याइतकें भांडवलशाहीच्या स्वरूपाचें आकलन टॉने यांनाहि होतें; आपलें राजकीय उद्दिष्ट साध्य होण्यासाठीं आर्थिक सत्तापालट झाला पाहिजे याचीही त्यांना जाणीव होती. आर्थिक वर्तनक्रम नियमित करण्याचें साधन म्हणून समाजवादाला आज प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे. अशा या जमान्यांत देखील समाजवाद हा मौलिकदृष्टया मानवी वर्तनक्रमाचा प्रश्न आहे, असा आग्रह त्यांनीं धरला. आणि माणसें बदलण्यासाठीं राज्य बदललें कीं पुरे, हा कम्युनिस्ट वा वेब पतिपत्नींनीं स्वीकारलेला सदोष विचार सदैव त्याज्य म्हणूनच मानला.

" या विश्वासाच्या योगानें त्यांच्या मानवतेला एकप्रकारची तीक्ष्ण धार होती व त्यांचे सर्व विचार सुसंगत बनले होते. भांडवलशाही अर्थव्यवस्था चालूं शकणार नाहीं, ती कोलमडून पडेल, असें त्यांनीं कधींहि म्हटलें नाहीं. नवनव्या तंत्रांच्या योगानें राहाणीचें मान सुधारण्याची क्षमता व सुबत्ता तिच्यांत निर्माण झाली, याचेंहि त्यांना कांहीं वाटलें नाहीं. त्यांचें म्हणणें अगदीं साधें व सरळ होतें कीं ती चुकीची आहे. तिच्यांतील संचयलालसेनें माणूस भ्रष्ट होतो आणि तिचा भरपूर फायदा घेणाऱ्या मालकांप्रमाणेंच ती कामगारांना देखील भ्रष्ट करूं शकते. बंधुत्व, समता व सामाजिक कर्तव्य यांवर आधारलेल्या नव्या सामाजिक नीतीचा स्वीकार करणारीं माणसेंच ती सुधारूं शकतील. खाजगी सुबत्ता व सामाजिक दारिद्र्य यांतील विरोध गालब्रेथ यांनीं आमच्या नजरेस आणण्यापूर्वीच टॉने यांनीं खाजगी व सामाजिक नीतीबाबतच्या भिन्नभिन्न मानदंडावर टीका केली होती. आपल्या "इक्वॉलिटी" व "दि ॲक्विझिटिव्ह सोसायटी" या ग्रंथांतून हीच भूमिका त्यांनीं मांडली होती. खाजगी हेतूंची परिणति सामाजिक हितसंवर्धनांत जोंवर होणार नाहीं तोंवर माणसाला संपूर्ण वा स्वाभिमानयुक्त जीवन जगणें अशक्य आहे, असें त्यांचें आग्रहाचें प्रतिपादन होतें.

" टॉने यांनीं केलेली मक्तेदारी व अन्याय यांजवरील टीका मान्य करणाऱ्या अनेकांना देखील त्यांची ही भूमिका सोयीची नव्हती. कारण तिच्यांत व्यक्तिगत जबाबदारीची कल्पना आहे. व अत्यंत मोठ्या नैतिक मनोधैर्यावाचून ही जबाबदारी पत्करतां येणें शक्य नाहीं. टॉनेच्या शब्दांतच सांगायचें म्हणजे त्यासाठीं "नव्या समाजनिर्मितीसाठीं सतत व स्थिर इच्छे"ची गरज आहे. विषमतेवर आधारलेल्या समाजाशीं कांहींसा अधिक सोयीचा समझोता करण्याच्या सौम्य तळमळीला तिच्यांत स्थान नाहीं. तथापि जॉन वुइक्लिफ् वा जॉन बॉल यांच्या काळापासूनचा ब्रिटिश जहालवाद याच महत्त्वाच्या टिकाऊ मध्यवर्ती कल्पनेवर आधारलेला आहे.

" टॉने हे याच परंपरेचे अलीकडच्या काळांतील एक थोर विचारवंत होत. लेव्हलर्स आणि चार्टिस यांनीं सुरू केलेलें कार्य पुरें करणें हीच मजूरपक्षाची खरी जबाबदारी आहे असें ते मानीत. यामुळेंच आपल्या भूमिकेला मुरड घालण्याची कल्पना त्यांना असह्य वाटे. तथापि आपण सुचवीत असलेल्या सुधारणांचा बारीक सारीक तपशील देखील व्यवहार्यतेच्या दृष्टीनें तपासण्यास ते नेहमींच तयार असत. मजूरपक्षाचें त्यांनीं अखेरच्या कांहीं दिवसांत केलेलें काम त्यांच्या दृष्टिकोणाशीं अनुरूप असेंच होतें. शैक्षणिक धोरणाचें स्वरूप निश्चित करण्याचा बराचसा कंटाळवाणा खटाटोप पक्षाच्या एका समितीचे सदस्य म्हणून ते करीत होते. परंतु तेथें "पब्लिक स्कूल्स" कायम राखावींत यासाठीं देण्यांत येणाऱ्या कोणत्याहि समर्थनाला ते बधले नाहींत.

" युरोपीय समाजवादानें निरनिराळीं पंथीय स्वरूपें धारण केलीं आहेत, व त्यापासून ब्रिटिश जहालवाद (रॅडिकॅलिझम्) चटकन् न समजणाऱ्या परंतु निश्चित अशा सकसपणामुळें अलगरीतीनें उठून दिसतो. या सकसतेचेंच टॉने हें एक उत्कृष्ठ प्रतीक होतें. प्रमाणवचनांपेक्षा नीतिमत्ता अधिक श्रेष्ठ होय, आणि त्याच्या भौतिक समृद्धिपेक्षां माणसाच्या जीवनाचा दर्जा नेहमीच अधिक मोलाचा मानला पाहिजे हा त्या सकसपणाचा गाभा होय. मजूरपक्षाच्या सर्व सभासदांची सामान्य मान्यता असेल तर ती याच बाबतींत. यामुळेंच माणसाच्या निष्ठेचा व प्रामाणिकपणाचा कस लागतो आणि समतेसाठीं झटणारा लोकशाहीवादी व सत्तेकरितां आसुसलेला हुकूमशाहा यांतील फरक स्पष्ट होतो. समाजवादाचा विजय अटळ आहे असें टॉनेंना कधींच वाटलें नाहीं. मानवतावाद हें त्यांना नेहमींच इच्छाशक्तीचें कर्तृत्व वाटे, तें ऐतिहासिक शक्तींचें कार्य म्हणून त्यांनीं कधींच मानलें नाहीं. आणि विवेकाचें व सदाचाराचें विश्व निर्माण करायचें झाल्यास माणसानें स्वतःपासूनच आरंभ केला पाहिजे व सर्व प्रकारच्या परिस्थितींत आपली निष्ठा कायम राखली पाहिजे या त्यांच्या भूमिकेचा त्यांचें जीवन हाच एक उत्कृष्ठ दाखला होय.

## पांचव्या अंकाची सुरुवात

दि. ४ जानेवारी १९६२, चा मँचेस्टर "गार्डीयन" लिहितो :

" गोव्याच्या पाडावामुळें सालाझार हुकुमशाहीच्या चमत्कारिक व कंटाळवाण्या नाटकाच्या पांचव्या अंकास सुरुवात झाली असल्याचें दिसत आहे. देशांतील ग्रामीण भागांतील लष्करी छावणींत डळमळूं लागलेल्या राजवटीविरुद्ध पहिलें पाऊल पडायचें, ही जुनी आयबेरियन परंपरा आहे. पोर्तुगालमध्यें नुकतेंच झालेलें बंड या परंपरेला अनुसरणारेंच होतें. सरकारी निवेदनाप्रमाणेंच "तें लागलींच दडपलें गेलें व प्राणहानि अगदीं कमी झाली." मात्र अशा चटकन् दडपल्या गेलेल्या बंडाळींत केवळ "पाहाणी" करण्यासाठीं गेलेल्या लष्करी खात्याच्या दुय्यम चिटणीसाचा अंत व्हावा हें एक कांहींसें गूढच होय !










"या बंडाळींत लष्करांतील अधिकाऱ्यांनीं प्रत्यक्ष भाग घेतला होता कीं काय यासंबंधीं सरकारी निवेदनांत कांहींच खुलासा नव्हता. बंडाचा नेता म्हणून अटक झालेला कॅप्टन व्हेरिया गोम्स हा गेल्या सार्वत्रिक निवडणुकींत विरोधी पक्षाचा उमेदवार होता. या निवडणुकींत विरोधी उमेदवारांना अटक तरी झाली किंवा त्यांचे अर्ज नामजूर तरी करण्यांत आले ! ज्यांच्या बाबतींत असें घडलें नाहीं त्यांनीं निवडणुकीपूर्वींच आपली नांवें मागें घेतलीं ! ! हा सर्व प्रकार प्रसिद्धच आहे. त्यावेळीं सरकारनें शंकास्पद अधिकाऱ्यांची हकालपट्टी करून लष्कराचा आपणांस पाठिंबा मिळेल अशी खात्री करून घेतली होती; आणि त्याबरोबरच अंगोलांतील घडामोडींचा फायदा घेऊन सैन्याच्या देशप्रेमालाहि यशस्वी रीतीनें आवाहन केलें होतें. त्यानंतर गोवा गेला ! गोव्याच्या बाबतींत निश्चयी धोरण न स्वीकारल्याबद्दल कांहीं विरोधकांनीं सरकारला दोष दिला खरा; पण तो अधिक काळपर्यंत ताब्यांत न राखल्याबद्दल असा दोष देणें फारसें उचित नाहीं. तथापि गोव्याचा पाडाव ही घटनाच अशी होती कीं जिच्यामुळें अगदीं परंपरावादी राजनिष्ठ अधिकाऱ्यांची देखील बंड करण्याकडे प्रवृत्ति व्हावी !

सांता मारिया प्रकरण, अंगोला, गोवा, हे सालाझार राजवटीला क्रमाक्रमानें बसलेले धक्के आहेत. उद्यां कदाचित् गिनींत किंवा आफ्रिकेंतील अन्य वसाहतींतहि असेच धक्के बसतील. असें असूनहि सालाझार राजवटीचें स्वरूप गेलीं तीस वर्षें होतें तसेंच अजूनहि आहे ! भडक अरेरावी किंवा हुकूमशाही म्हणून त्याचें वर्णन करतां येणार नाहीं. अत्यंत संकुचित व कर्मठ स्वरूपाचा परंपरावाद हेंच त्याचें यथार्थ स्वरूप होय. विसाव्या शतकाकडे पूर्ण दुर्लक्ष केलें म्हणजे तें निघून जाईल असा त्याचा विश्वास आहे ! पोर्तुगालचे अध्यक्ष ॲड्मिरल् अमेरिको टॉमस् यांनीं बंडाळीनंतर केलेल्या नभोवाणीवरील भाषणांत हाच विश्वास प्रकट झाला आहे ! यामुळें गतकालांत इतर वसाहती जशा परत घेतल्या गेल्या तसाच गोवाहि कधींतरी आपण परत घेऊं शकूं, अशी आशा त्यांनीं व्यक्त केली. मुळांतच अत्यंत मर्यादित केलेले नागरीक हक्क या राजवटीनें आतां शिकलेल्या आफ्रिकन लोकांना इतक्या उशीरा देऊं केले आहेत. व आफ्रिकन मुलुखांतील मजुरांबाबतची ठेकेदारी प्रथा व कापूस पिकवण्याची सक्ती दूर करण्याचा निर्णय घेतला आहे ! तथापि आफ्रिकन प्रजेची स्वतःचें राज्य चालविण्यासाठीं आवश्यक तयारी करण्याच्या कल्पनेचा अजून मागमूसहि नाहीं !

अजूनहि वेळ टळून गेली आहे असें नाहीं. पोर्तुगीज सरकारनें ज्यांची अंतिम परिणति स्वातंत्र्यांत होईल असे अधिकार अधिकाधिक प्रमाणांत आफ्रिकन प्रजेला देण्याचें धोरण स्वीकारल्यास व तें मोकळेपणानें अंमलांत आणावयाचें म्हटल्यास बेल्जियन काँगोसारखी परिस्थिति पोर्तुगालच्या आफ्रिकी वसाहतींत उद्भवण्याचें कारण राहणार नाहीं. पण अशा प्रकारचें धोरण स्वीकारणारें सरकार सालाझारचें असणार नाहीं. सालाझारऐवजीं दुसरी एकादी राजवट पोर्तुगालमध्यें येईल कीं नाहीं हें दुर्दैवानें तितकेसें स्पष्ट नाहीं. वसाहतींना स्वातंत्र्य देण्याच्या मुद्यावर विरोधी पक्षांचें एकमत झालें असलें तरी इतर अनेक प्रश्नांवर त्यांच्यांत महत्त्वाचे मतभेद आहेत. उलट, ब्रिटिश मैत्रीबद्दल निराश झालेला सालाझार जणुं आपोआपच फ्रँकोच्या वळणावर जाऊं लागला आहे व दोहोंतील मैत्री वाढूं लागली आहे ! परंतु दोहोंपैकीं सालाझारची पकड आधीं ढिली होऊं लागल्याचें दिसत आहे. दोघेहि एकदम नाहींसे झाल्यास किंवा आपली सर्व साधनसामुग्री बाहेरच्या मुलुखांतील आपलें वजन वाढविण्यासाठीं त्यांनीं उपयोगांत आणण्याचें ठरविल्यास त्यांचा शेवट हा जगाला

निरनिराळ्या प्रदेशांत लहानमोठे अनेक धक्के दिल्यावांचून राहाणार नाहीं हें खास.

## चीन व अल्बेनिया

सोविएट रशिया व अल्बेनिया यांचे संबंध आतां दुरावले असून पूर्व युरोपांतील सोविएट साम्राज्याला त्या योगानें महत्त्वाचा तडा गेला आहे. या कलहाच्या बातम्या गेले काहीं दिवस–विशेषतः नुकत्याच झालेल्या बावीसाव्या कम्युनिस्ट पक्षांच्या परिषदेनंतर- विशेष प्रामुख्यानें येऊं लागल्या होत्या. आणि त्याबरोबरच या कलहामुळें कम्युनिस्ट चीन व अल्बेनिया यांचें सख्य वाढत असल्याचेंहि वृत्त होतें. या मैत्रीचाच एक भाग म्हणून चीननें अल्बेनियाला देऊं केलेलें आर्थिक साहाय्य तो आतां देऊं शकणार नाहीं असा तज्ज्ञांचा अंदाज आहे. याचें मुख्य कारण म्हणजे वाढत्या अंतर्गत आर्थिक अडचणी हें होय. तसें झाल्यास, सोविएट रशियानें आर्थिक साहाय्य बंद केल्यामुळें आधींच अडचणींत आलेलें हें लहानसें राज्य अधिकच संकटांत सांपडणार आहे.

अल्बेनियाला देण्यांत येणारें आर्थिक साहाय्य सोविएट रशियानें पूर्णतया बंद केलें आहे. याबद्दलचा पहिला इशारा प्रथम नोव्हेंबर १९६१ च्या आरंभीं देण्यांत आला. त्यावेळीं अल्बेनियन कम्युनिस्ट पक्षाचा प्रमुख एन्वर होक्सा यानें हा गौप्यस्फोट केला. “आम्हास सोविएट रशियाकडून मिळावयाचें सारें साहाय्य बंद करण्यांत आलें असून अशा प्रकारें आमच्या तिसऱ्या पंचवार्षिक योजनेला सुरुंग लावण्याचा प्रयत्न केला जात आहे. ज्यांची आम्हास गरज होती असे सर्व सोविएट तंत्रज्ञहि अगदीं एकपक्षीय निर्णय घेऊन परत बोलावण्यांत आले आहेत.” सोविएट धोरणाच्या अनुषंगानें पोलंडनेहि अल्बेनियाला देऊं केलेलें आर्थिक साहाय्य रद्द केलें आहे, व इतर कम्युनिस्ट राष्ट्रेंहि याच धोरणाचा पाठपुरावा करतील अशी अपेक्षा आहे.

“कम्युनिस्ट चीननें मात्र मॉस्कोचें धोरण उघडपणें त्याज्य मानलें असून अल्बेनियांतील क्रुश्चेव्हच्या राजकीय विरोधकांना जाहीर पाठिंबा दिला आहे व या भूमिकेंतूनच आर्थिक साहाय्य देण्याचीहि घोषणा केली आहे.”

चीनच्या या साहाय्याला गेल्या फेब्रुवारी महिन्यांतच मूर्त स्वरूप प्राप्त झालें होतें. तत्संबंधीं सहा निरनिराळ्या करारांवर सह्या झाल्याची बातमीहि “पीपल्स् डेली”नें दिली होती. साहाय्याच्या रकमेचा मात्र त्यांत उल्लेख नव्हता. सुमारें सव्वा अकरा कोटी नवे रुबल्स् म्हणजे साडेबारा कोटी डॉलर्सचें कर्ज कम्युनिस्ट चीननें अल्बेनियाला देऊं केलें आहे, अशी बातमी एप्रिलच्या सुमारास मिळत होती. याखेरीज चीननें काहीं प्रमाणांत अन्नधान्याचे रूपानें साहाय्यहि देऊं केलें होतें.

८५ निरनिराळ्या प्रकल्पांसाठीं सर्व प्रकारची यांत्रिक सामुग्री व तंत्रविषयक साहाय्य देण्याच कम्युनिस्ट चीननें कबूल केलें होतें. ट्रॅक्टर, शेतीचीं अवजारें, अन्नधान्य व इतर अनेक प्रकारचें साहाय्य यांचा त्यांत समावेश होता.

चीनमधील उपासमारीच्या ज्या बातम्या येत आहेत त्यावरून हें सर्व साहाय्य देणें चीनला अत्यंत जड जाईलसें दिसूं लागलें आहे. या वर्षी चीनलाच साडेछत्तीस कोटी डॉलर्सचें अन्नधान्य ऑस्ट्रेलिया, फ्रान्स व कानडा यांजकडून विकत घेणें भाग पडलें आहे. परकीय चलनांतून द्यावी लागणारी किंमत भरतां यावी यासाठीं चीननें लंडनच्या बाजारपेठेंत सोनें व चांदी विकली आहे!

१९५७ हें चीनमधील दुष्काळाचें वर्ष होतें. या वर्षीचीं पिकेंहि त्या वर्षासारखींच आहेत. प्रजेची संख्या मात्र त्यावेळीं कितीतरी कमी होती. यामुळें अल्बेनियाला दिलेलें अभिवचन पुरें करायचें म्हटल्यास अधिक अन्नधान्य पाश्चात्य राष्ट्रांकडून विकत घेण्याचा प्रसंग चीनवर येईल अशी अपेक्षा आहे.








## कलहक्षेत्रांत येऊं लागलेली लॅटिन अमेरिका

कॅस्ट्रो राजवटीचें धोरण सोविएटच्या दिशेनें कलूं लागतांच केवळ अमेरिकेच्या भौगोलिक सान्निध्यामुळें लॅटिन अमेरिका डावीकडे झुकणार नाहीं या भ्रमाचा भोपळा फुटूं लागला आहे. यामुळेंच अमेरिकेला लॅटिन अमेरिकेंत कम्युनिझम व कॅस्ट्रोविरोधी आघाडी उघडण्यासाठीं दोन हजार कोटी डॉलर्सची शेती, औद्योगिक व सामाजिक सुधारणांची आघाडी उघडणें भाग पडलें आहे.

लॅटिन अमेरिकेच्या प्रश्नाचें गांभीर्य स्पष्ट करणारा एक लेख तेथील संयुक्त राष्ट्रसंघटनेच्या इकॉनॉमिक कमिशनचे प्रमुख डॉ. प्रेबिश यांनीं लिहिला आहे. लॅटिन अमेरिकेची लोकसंख्या सध्यां २० कोटी असून येत्या चाळीस वर्षांत ती ६० कोटींवर जाईलसा अंदाज आहे. परकीय राष्ट्रांच्या सहकार्यानें तंत्रविद्येचा प्रसार होण्यास हरकत नाहीं; परंतु प्रत्यहीं बिकट होत जाणारा प्रश्न सोडविण्यासाठीं अंतर्गत संचय काढणें जरूर आहे. त्यासाठीं या प्रदेशांतील दरडोई उत्पन्न वाढलें पाहिजे. आज हें उत्पन्न २०० डॉलर इतकें असून त्यांत दरवर्षी अवघी एक टक्का वाढ होत आहे. म्हणून या प्रदेशांत खाजगी मालकीच्या चौकटींत स्थानिक कौशल्य व साधनसामुग्रीचा झपाट्यानें विकास करणारे प्रयत्न झाले पाहिजेत. खाजगी मालकीविषयींहि दुराग्रह असतां कामा नये. कांहीं प्रमाणांत राज्यसत्तेद्वारा आर्थिक नियोजनाचा कार्यक्रम हातीं घेणेंहि आवश्यक होईल.

या विवेकयुक्त भूमिकेविरुद्ध कम्युनिस्ट प्रचार सुरू आहे. या प्रदेशांतील प्रश्नांवर कम्युनिझम् हा एकच उपाय होय असें त्यांचें म्हणणें आहे. युराग्वेतील कम्युनिस्ट नेता रॉदने ॲरिस्मेंडी लिहितो.

"लॅटिन अमेरिकेंत सामान्यतः ग्रामीण प्रजेचें प्रमाण अधिक आहे, तरी देखील नागरी प्रजेची संख्या ४० टक्क्यांइतकी आहे. कांहीं देशांत तर निम्मेहून अधिक लोक शहरांत राहातात. उद्योगधंदे व वाहतूक या क्षेत्रांत काम करणारांची संख्या १२० लक्ष आहे. भांडवलशाही विकास होऊनहि लॅटिन अमेरिका हा अजून मागास प्रदेशच आहे. व तो इतरांवर अवलंबून आहे. एकतर, लॅटिन अमेरिका अजून शेतीप्रधानच असून ती इंधन व कच्चा मालच काय तो निर्माण करते. त्याचाहि पुरवठा बव्हंशी साम्राज्यवादी ठेकेदारांच्याच हातांत आहे ! शेतीहि मोठमोठ्या मालकांच्या ताब्यांत आहे. नफा, व्याज व हुंडणावळीचें सममूल्यन इ० रूपानें राष्ट्रीय उत्पन्नाचा बराच वाटा साम्राज्यवाद्यांकडेच जातो. यामुळें अंतर्गत भांडवलाचा पुरवठा वाढविणें कठीण आहे. यामुळें यावर कम्युनिस्ट क्रांति हा एकच मार्ग आहे.

यानंतर याहिपुढें जाऊन ॲरिस्मेंडीनें सामाजिक क्रांतीपेक्षांदेखील अमेरिकेचा विरोध अधिक महत्वाचा आहे असें म्हटलें आहे. लॅटिन अमेरिकेंतील राष्ट्रांच्या ऐक्याचें खरें कारण हा सामान्य शत्रु हें होय. अमेरिकेनें निर्माण केलेल्या भांडवलापकीं ३६ टक्के भांडवल या प्रदेशांत गुंतविलें आहे. तसेंच अमेरिकेच्या परराष्ट्र व्यापारांतील एक तृतीयांश व्यापार या प्रदेशाशींच आहे. अमेरिकेंत आयात होणाऱ्या निरनिराळ्या कच्च्या मालापैकीं ३० ते ७० टक्के मालाचा पुरवठा या प्रदेशांतूनच होतो. हे आकडे खरे मानायचे कीं काय हा एक प्रश्नच आहे. लॅटिन अमेरिकेंतील जनतेला भडकविण्यासाठीं ते देण्यांत आले आहेत हें उघड आहे. तथापि ते योग्य मानले तरीदेखील त्यावरून ॲरिस्मेंडीला अभिप्रेत असलेला अर्थ निघतोच असें नाहीं. उदाहरणार्थ, अमेरिकेंत व्हेनेझुएलांतून पेट्रोल किंवा चाइलमधून तांबें आयात केलें जातें हें खरें आहे. तथापि पेट्रोल व तांबें यांचें जगांत सर्वाहून अधिक उत्पादन अमेरिकेंत होतें हें विसरून चालणार नाहीं. यामुळें केवळ आर्थिक दृष्टीनें बोलायचें झाल्यास ही भागीदारी व्हेनेझुएला व चाइल यांच्याच हिताची आहे असें म्हणावें लागतें.







हुंडणावळीचें सममूल्यन करण्याच्या " भांडवलशाही " धोरणावर ॲरिस्मेंडीनें टीका केली आहे. पण पूर्व युरोपांतील " जनता लोकशाह्या"शीं होणारा सोविएट आर्थिक व्यवहारहि याच तत्त्वावर आधारलेला आहे. अमेरिकेंतील राहणीचें मान अधिक चांगलें असल्यानें लॅटिन अमेरिकेच्या कितीतरी मालाला गिऱ्हाइक मिळूं शकतें. ब्राझील-मधील कॉफी हें त्याचें उत्तम उदाहरण होय.

तात्पर्य, लॅटिन अमेरिकेच्या अमेरिका व सोविएट युनियन यांच्याशीं असलेल्या आर्थिक संबंधांना कम्यु-निस्ट प्रचारामुळें विकृत स्वरूप दिलें जात आहे. तथापि सोविएटचा या प्रदेशाशीं इतका मर्यादित व्यापारी संबंध आहे व तो वाढण्याची शक्यता इतकी मर्यादित आहे कीं त्यामुळें या प्रचाराचा विशेष उपयोग होईल अशी भीति वाटण्याचें फारसें कारण नाहीं. या विधानाला क्युबा हा देखील अपवाद नाहीं. सोविएट आर्थिक मदतीमुळें सोविएट व क्युबा यांच्यांत राजकीय मैत्री जुळलेली नाहीं. प्रथम राजकीय संबंध जडला व राजकीय सहकार्यामुळ क्युबाला आर्थिक मदत देण्यांत आली. मदतीचें या बाबतींतलें प्रमाण सोविएट इतर लॅटिन अमेरिकन राष्ट्रांच्या बाबतींत स्वीकारील असा मुळींच संभव नाहीं.

अजून तरी लॅटिन अमेरिकन राष्ट्रांना सोविएट आर्थिक साहाय्य अगदीं तुटपुंजेंच आहे; इतकेंच नव्हे तर राजकीय दृष्टीनें या प्रदेशांतील कम्युनिस्ट आंदोलन हेंहि दुबळेंच आहे. जनता हळूंहळूं क्रांतिवादी विचाराकडे झुकत आहे खरी. पण या क्रांतिवादी प्रवृत्तींचें नेतृत्व कम्युनिस्ट पक्षांकडे नाहीं. कम्युनिस्ट पक्षांना अजून जनतेचा पाठिंबा नाहीं. मूठभर पक्षीय सभासद हेच कायते त्यांत आढळतात. ही गोष्ट स्वतः ॲरिस्मेंडीनें देखील मान्य केली आहे. तथापि दुर्बल असले तरी हे पक्ष मॉस्कोला निष्ठापूर्वक पाठिंबा देत असतात. उदा० नुकत्याच झालेल्या मॉस्को परिषदेंत अनुभ-वास आलेले मॉस्को-चीन मतभेद वा अल्बेनियाशीं कलह या घटनांचा लॅटिन अमेरिकन कम्युनिस्ट पक्षावर फारसा परिणाम झाला नाहीं. लॅटिन अमेरिकेंतील कम्युनिस्ट पक्षांपैकीं अकरा पक्षांनीं मॉस्कोची बाजू घेतली; अवघा एक पक्ष चीनच्या बाजूला होता व पांच तटस्थ राहिले होते.

लॅटिन अमेरिकेंतील आजचा खरा धोका सोवि-एट किंवा चीनच्या वर्चस्वाचा नाहीं. आर्थिक परि-स्थितींतून उद्‌भवणारे सामाजिक ताण, दर माणशीं उत्पन्नाचें तुटपुंजें प्रमाण, कॅस्ट्रोच निर्माण केलेलें विभूतिमत्त्व, शेतीचा प्रश्न, व कोणत्याहि सुधार-णांना होणारा प्रतिगामी शक्तींचा तीव्र विरोध, इत्यादींत खरा धोका आहे. या प्रदेशांतील कित्येक राष्ट्रांत आढळणारी अमेरिकेच्या द्वेषाची भावना आपणास उपयोगी पडते कीं काय याचा कम्युनिस्ट अंदाज घेत आहेत. आजवर " अमेरिका आपले हितसंबंध मोठमोठ्या जमीनदारांच्या व भांडवलदारांच्या हितसंबंधांशीं जोडूं पहात आहे " हीच ॲरिस्मेंडीप्रणित भूमिका कम्युनिस्ट प्रचारांत दिसून येते. अमेरिकेनें तयार केलेली आर्थिक साहा-य्याची नवी योजना सुधारणा घडवून आणण्याच्या हेतूनें केली आहे. यामुळें ती कम्युनिस्टांना रुचणें कठीण आहे. यामुळें अमेरिकेच्या हेतूविषयीं शंका निर्माण करणारा प्रकार ते करतील हें उघड आहे. अमेरिकेस विरोध करण्यासाठीं कम्युनिस्ट स्वतः सर्व प्रकारच्या प्रतिगामी शक्तींशीं एकजट करतात असा प्रत्यक्ष अनुभव आहे. आजवर लॅटिन अमेरिकेंतील अनेक हुकुमशहांना त्यांनीं पाठिंबा दिल्याचें प्रसिद्ध आहे. व आतांहि अमेरिकेनें सुधारणांचा आग्रह धरला कीं " राष्ट्रीय सार्वभौमत्वा"च्या घोषणा पुनः कानावर येऊं लागतील. अशा प्रकारें मॉस्कोच्या हिताचें धोरण स्वीकारण्यासाठीं जनतेच्या खऱ्याखुऱ्या कल्याणाचा बळी दिला जाईल हा संभव ध्यानांत घेणें जरूर आहे.










प्रा. गोवर्धन पारीख

# राष्ट्रीय एकात्मतेची समस्या : कांहीं विचार

( अमदाबाद् येथील 'हॅरोल्ड लास्की इन्स्टिट्यूट ऑफ् पोलिटिकल सायन्स' या संस्थेच्या वतीनें दिनांक ४ डिसेंबर १९६१ रोजी दिलेल्या "हॅरोल्ड लास्की मेमोरिअल लेक्चर" चा सारांश ).

मी निवडलेला विषय परिचित असाच आहे. आज तर तो सभोंवतालच्या वातावरणांत सर्वत्र चर्चिला जात आहे. एका अर्थी आपल्या राष्ट्रीय एकात्मतेचा प्रश्न जुनाच आहे. दिल्ली येथें नुकत्याच भरलेल्या परिषदेनें त्याची केवळ आठवण करून दिली इतकेंच. तथापि हा प्रश्न सोडविण्याच्या दीर्घकालीन प्रयत्नानंतरहि तो आतां सुटण्याच्या मार्गाला लागला आहे असें म्हणणें कांहींसें धाडसाचेंच ठरेल.

## घोषणा आणि व्यवहार यांतील अंतर

देशांतली आजची परिस्थिति भयावह नसेलहि. तथापि अनेकांना तिच्याविषयीं चिंता वाटते यांत संशय नाही. भविष्यांविषयीं चिंता वाटण्याचें मुख्य कारण म्हणजे स्वातंत्र्यप्राप्तीनंतर चवदा वर्षें लोटलीं असूनहि अजून आम्हांला आपल्या राष्ट्रीय जीवनाची तात्त्विक बैठक निश्चित करतां आली नाहीं हें होय. आम्ही नित्य नव्या विचारसरणींच्या मागें जातो आणि लागलीच आमच्या परिस्थितींतील प्रश्न सोडविण्यासाठीं त्या अपुऱ्या आहेत असें आम्हांस वाटूं लागतें; त्यांचा अर्थ व त्यांचे संभाव्य परिणाम या विषयीं काळजी निर्माण होते आणि घोषणा व व्यवहार यांमध्यें वाढती तफावत दिसूं लागते. हा सारा प्रकार म्हणजे 'संघटित ढोंगबाजी' च नव्हे काय ? सार्वजनिक घोषणांतून ज्यांची निर्भर्त्सना करावयाची त्या विषयींच खासगीरीत्या प्रेम आणि जिव्हाळा दाखवावयाचा, असाच या वर्तनाचा अर्थ समजावा काय ? कीं आम्हीं सारेच परिस्थितीचे गुलाम बनलो आहोंत, नियतीपुढें आमचें काय चालणार, असा याचा अर्थ करायचा ? मला वाटतें या दोनहि प्रकारांत ज्यांची गणना होऊं शकणार नाहीं असे कांहीं लोक तरी आमच्यांत असणें शक्य आहे. घोषणा व व्यवहार यांतील अंतर नाहींसें केलें पाहिजे; आणि आपलें भवितव्य आपणच घडविलें पाहिजे अशी ज्यांच्या ठिकाणीं तीव्र इच्छा आहे त्यांच्याशींच मला आज विचारविनिमय करावयाचा आहे. कांहीं विचार त्यांच्या पुढें मांडावयाचे आहेत. त्या योगानें आपल्यापुढील प्रश्नांचें उत्तर सांपडेल असें जरी नसलें तरी उत्तर शोधण्याचे कांहीं मार्ग सांपडण्याचा निदान संभव आहे.

## एकात्मतेचा अर्थ तरी काय ?

अशा प्रकारचा विचारविनिमय अर्थपूर्ण व फलदायी व्हावयाचा झाल्यास तो कोठल्यातरी सामान्य वैचारिक भूमिकेवरून होणें आवश्यक आहे. राष्ट्रीय एकात्मता या शब्दसमूहाला निश्चित अर्थ नाहीं. म्हणून प्रथम ही कल्पना स्पष्ट होणें जरूरीचें आहे. "राष्ट्र" आणि "राष्ट्रवाद" या दोन कल्पना एकमेकींपासून भिन्न आहेत. राष्ट्रवाद ही एक समुदायवादी आणि लोकशाहीविरोधी कल्पना आहे. एकेकाळीं, पुरोगामी व प्रतिगामी, संकुचित आणि व्यापक, राष्ट्रवाद अशा तऱ्हेचे भेद आम्हीं करीत होतों. त्यांतील तथ्यातथ्यतेचा विचार क्षणभर बाजूस ठेविला तरी आजच्या परिस्थितींत राष्ट्रवाद हा एक जुनाट व निरुपयोगी पंथ बनला आहे असें निश्चितपणें म्हणतां येतें. म्हणून लोकशाहीला मान्यता देणाऱ्या देशांत राष्ट्रीय एकात्मता म्हणजे "राष्ट्रवादी" एकात्मता असा अर्थ करतां येत नाहीं. राष्ट्रवादी एकात्मतेंत सर्वांवर भ्रातृभाव जबरदस्तीनें लादण्याचा विचार अभिप्रेत आहे. 'जर तूं माझा भाऊ आहेस हें मान्य करणार नसशील तर मला तुझें डोकें फोडावें लागेल' अशा अर्थाच्या एका जर्मन श्लोकांत तो उत्कृष्टरीत्या व्यक्त झाला आहे. अशा प्रकारच्या समुदायवादी दावणीपासून राष्ट्रीय एकात्मतेची कल्पना मुक्त केली पाहिजे. ही एकात्मता म्हणजे "विशिष्ट भूखंडावर रहात असलेल्या लोकांचें ऐक्य. एका सामान्य लोकशाही राजवटींत रहाण्याचो त्यांची

तयारी" असा निश्चित अर्थ तिच्या योगानें व्यक्त झाला पाहिजे.

## भविष्याला भूताची आवश्यकता ?

यावर असा प्रश्न उद्भवतो कीं, हा एक प्रकारचा पुस्तकी दृष्टिकोन नव्हे काय, असें मानणें शक्य आहे काय ? भविष्याची इमारत भूतकाळच्या पायावर उभारावी लागणार नाहीं काय ? या शंकासंबंधानें थोडेंसें बोलणें जरूर आहे. भविष्य हें भूतकाळावर उभारलें गेलें पाहिजे असें निश्चितपणें म्हणतां येईल कीं काय याविषयीं मला शंका आहे. आज जगांतील एक अत्यत बलवान असें राष्ट्र आपल्या समोर आहे कीं ज्याला फारसा भूतकाळ दिसतच नाहीं. भूतकाळाच्या अभावामुळें त्याच्या विकासांत अडचणीं निर्माण झाल्या नाहींत. आपल्याला मोठा दीर्घकालीन भूतकाळ आहे हें खरें, व तो विसरतां येणार नाहीं हेंहि तितकेंच खरें. परंतु याचा अर्थ भूतकाळांत केव्हां तरी आदर्श जीवन अस्तित्वांत होतें व तें आतां पुन्हां शोधलें पाहिजे असा नाहीं. देशांतील सर्वांना स्फूर्तिदायक वाटेल अशा तऱ्हेचं आदर्श जीवन आमच्या भूतकाळांत नाही. आजच्या ऐक्याच्या गरजेला आवश्यक पाया पुरविण्याचें सामर्थ्य त्याच्यांत नाहीं. त्यांतील महान् व्यक्ती ह्या आमच्यांतील कांहींच्या महान् व्यक्ती आहेत, इतरांना त्यांच्यापासून स्फूर्ति मिळत नाहीं. इतिहासकालीन पराक्रमाच्या कांहींच्या स्मृति ह्या इतर कांहींच्या दुःखाच्या व पराभवाच्या स्मृति आहेत. कांहींच्या विजयामुळें इतर कांहींना हालअपेष्टा सहन कराव्या लागल्या आहेत. या ठिकाणीं तपशीलवार घटनांचा उल्लेख करण्याचें कारण नाहीं. त्या आपणां सर्वांच्या परिचयाच्या आहेत. परंतु सर्वांनीच भोगलेल्या हालअपेष्टांची स्मृति ही केवळ शे-दीडशें वर्षांतील इंग्रजांच्या राजवटीपुरतीच मर्यादित आहे असें म्हणावें लागतें आणि ती दुःख आणि हालअपेष्टांची कहाणी बहुतांशीं देशाच्या विकासाचा व आधुनिकीकरणाचा मार्ग रोखला गेल्यामुळेंच निर्माण झाली होती हेंहि सत्य आहे. आज आपण हा विकास आणि हें आधुनिकीकरण साधण्याचा प्रयत्न करीत आहोंत. तसें करतांना या काळांतलि इतिहासापासून दुसराहि एक बोध घेणें आवश्यक आहे. "विकासक्रमांतील अडथळा" यापेक्षां अधिक व्यापक स्वरूपांत इंग्रजी राजवटीचा अर्थ राष्ट्रवादानें केल्यामुळें त्यांच्या सर्वोच्च विजयाचा हाच क्षण त्यांच्या अत्यंत मोठ्या पराभवाचा क्षणहि ठरला हा तो बोध होय. इतिहासापासून स्फूर्ति मिळविण्याचा, त्यांत कोणत्या तरी गूढ अर्थानें ऐक्य भावना होतीच असें समजण्याचा आग्रह धरिल्यास, भविष्यांत अधिक मोठी निराशा पदरांत पडणें शक्य आहे. आमच्या विशिष्ट परिस्थितींत तरी निदान इतिहास हा स्फूर्तिदायक व मार्गदर्शक ठरूं शकत नाहीं. त्याची चिकित्सा व मूल्यमापन होणें जरूर आहे. म्हणजे त्यांतून हंसक्षीरन्यायानें निवड करतां येईल. भूतकाळाच्या थडग्यांकडे आशाळभूतपणें पहाणारा राष्ट्रवाद सोडून आम्हीं आपलें लक्ष भविष्यविषयक आकांक्षा व प्रयत्न यांकडेच वळविलें पाहिजे; असें झालें तरच आत्मविश्वासपूर्वक भविष्याची उभारणी करतां येईल.

## भविष्यकाळ हाच एकात्मतेचा आधार

इतिहासाचा प्रश्न क्षणभर बाजूस ठेवून विचार केल्यास आजच्या ऐक्याला अन्य प्रकारचा राष्ट्रवादी पायाहि उपलब्ध नाहीं हें स्पष्ट आहे. वांशिक, धार्मिक व भाषिक ऐक्य राष्ट्रनिर्मितीला अपरिहार्य असतें असें जरी नसलें, तरी यांतील एखाद दुसऱ्या बाबतींत कां होईना, प्रत्यक्षांत ऐक्य असल्यास राष्ट्रीय ऐक्याची भावना मजबूत होऊं शकते असें मानलें जातें. तथापि, यांतील कोणतेंहि ऐक्य आमच्यांत अस्तित्वांत नाहीं; उलट इतर क्षेत्रांत ऐक्य निर्माण करणाऱ्या आमच्या प्रयत्नांना या अभावामुळें प्रत्यही अडथळा निर्माण होतो असा अनुभव आहे ! भावनांची एकत्र गुंफण करण्यासाठीं आवश्यक असलेलें भूमीचें प्रतीक हेंहि येथें नाहींसें झालें आहे. तात्पर्य देशाची "भावनात्मक घडण" दुर्बल आहे. किंबहुना देशांतील सर्व जनतेचा विचार केल्यास ती खरोखर अस्तित्वांतच नाहीं असें म्हणावें लागतें. "राष्ट्र हें एक अध्यात्मिक तत्त्व आहे" असें प्रसिद्ध फ्रेंच तत्त्ववेत्ता रेनॉ याचें म्हणणें आहे. पण ज्या दोन गोष्टींच्या आधारावर या तत्त्वाची जोपासना होऊं शकते त्यांतील सामान्य भूतकालीन दुःखें ही गोष्ट आमच्या इतिहासांत नाहीं. यामुळें राष्ट्राची उभारणी करण्यासाठीं "भावी काळ व त्यांतील आशा आणि आकांक्षा" यांच्याकडेच वळणें आम्हांस क्रमप्राप्त आहे.








## इतिहासाच्या पुनर्मूल्यनाची आवश्यकता

भूतकाळ पुसून टाकावयाचा असा याचा अर्थ नाहीं. तसें करणें शक्यहि नाहीं. येथें इतकेंच प्रतिपादन करावयाचें आहे कीं, भूतकाळाचा उदोउदो करणें, त्याची पूजा बांधणें, त्यामध्यें कांहीं तरी गूढ तत्त्व शोधण्याची धडपड करणें, वा त्या संबंधानें कांहीं तरी काल्पनिक अर्थ लावीत बसणें, हा आजच्या ऐक्यनिर्मितीच्या आशेनें सर्वत्र आढळणारा उपक्रम सोडावयास पाहिजे. भूतकाळ हा सतत आमच्या बरोबर राहीलच. आजहि आम्हांस रास्त अभिमान वाटावा असे अनेक घटक त्यांत आहेत. त्यांतील कांहींची आमच्या आजच्या समस्या सोडविण्यास मदत होऊं शकते हेंहि खरें आहे. परंतु हें सारें व्हावयाचें झाल्यास त्यासाठीं भूतकालाकडे चिकित्सक बौद्धिक दृष्टिकोनांतून पाहिलें पाहिजे. भूतकालीन मानदंड घेऊन त्यांच्या आधारानें वर्तमानाचें व भविष्याचें मूल्यमापन करणें इष्ट नव्हे; आजच्या गरजा व भविष्यविषयक आकांक्षा यांच्या मानदंडानीं परंपरांचें आणि इतिहासाचें पुनर्मूल्यन होणें जरूर आहे.

## एकात्मतेची समस्या म्हणजेच लोकशाही ऐक्याची समस्या

राष्ट्रीय एकात्मतेच्या कल्पनांनीं सूचित होणारा समुदायवादी अर्थ बाजूस ठेविल्यास "राष्ट्रीय एकात्मतेची समस्या म्हणजे लोकशाही ऐक्याची समस्या" हें म्हणणेंच रास्त ठरतें. या प्रश्नाची अशा रीतीनें मांडणी करण्यांत अनेक तऱ्हेचे फायदे आहेत. एक तर त्या योगानें ही समस्या सोडविण्यासाठीं आमच्या मूलभूत लोकशाही बैठकीशीं सुसंगत असेच मार्ग स्पष्टपणें शोधावे लागतील; ऐक्याचा अर्थ अधिक व्यापक बनेल, आणि एका समुदायवादाच्या आगींतून दुसऱ्याच्या फुफाट्यांत पडण्याचा प्रसंग ओढवणार नाहीं. भविष्याविषयींचा दृष्टिकोन स्पष्ट होऊं शकेल, आणि वैफल्याचा संभव टाळला जाईल.

## वैयक्तिक दृष्टिकोन बदलण्याची आवश्यकता

आम्ही सर्व स्वतंत्र होऊं इच्छित होतों व त्यासाठीं आम्हीं झगडलों. परंतु स्वातंत्र्य प्राप्त होतांच सर्व प्रकारचे लहानसहान अहंकार वर येऊं लागले ही वस्तुस्थिति कोण नाकारूं शकेल ? भाषिक प्रश्नावर भर दिल्यास जातीय भावना नाहींशा होतील अशीं स्वप्नें कांहींनीं पाहिलीं. परंतु भाषिक प्रश्नांचें समाधान होतांच पुन्हा जाती डोकें वर काढूं लागल्याच ! आधीं लहान, नंतर अधिकाधिक मोठे, असे गट क्रमाक्रमानें संघटित केल्यानें राष्ट्रीय ऐक्याचा प्रश्न सुटूं शकेल अशी कांहींची समजूत आहे. पण ती भ्रामक असल्याचें अनुभवानें भरपूर सिद्ध झालें आहे. सुसंघटित जाती प्रादेशिक ऐक्याचा पाया बनूं शकत नाहींत, सुसंघटित प्रदेश हे राष्ट्रीय ऐक्याचा पाया बनूं शकत नाहींत, असा इतिहासाचा स्पष्ट दाखला आहे. आणि या दिशेनें प्रयत्न करूं पहाणें म्हणजे परिणामी पराभव पत्करणेंच होय असें म्हणावयास भरपूर जागा आहे. म्हणून राष्ट्रीय ऐक्याच्या प्रश्नाची नव्यानें मांडणी करणें ही खरी गरज आहे, व ती अशा रीतीनें केली पाहिजे कीं त्या योगें निरनिराळ्या पातळीवरील समुदायवादी गटांचें ऐक्य वा लहान गटांच्या मानानें मोठ्या गटांच्या ऐक्याचें वाढतें महत्त्व प्रतिपादन करणें असा तिचा अर्थ होणार नाहीं. उलट ह्या मांडणींतून राष्ट्रीय ऐक्याचा प्रश्न म्हणजे व्यक्तीचा दृष्टिकोन बदलण्याचा प्रश्न होय हें स्पष्ट झालें पाहिजे; विचारांत आणि वर्तनांत लोकशाही मार्गानें प्रत्येकजण जाऊं शकेल अशा तऱ्हेची सुसंवादी पातळी तिच्यांत अभिप्रेत असली पाहिजे.

## आमच्या आशा-आकांक्षांचा योग्य अर्थ

व्यक्तिवाद निर्माण होण्यापूर्वींचा समुदायवाद आणि व्यक्तिवादानंतरचा समुदायवाद यांच्यांत कांहीं वेळां फरक करण्यांत येतो. पूर्वींचा समुदायवाद हा इतिहासाच्या प्राथमिक अवस्थेंतील वा मध्ययुगीन असून तो धर्मांतून निर्माण झालेला वा धर्माशीं संबंधित असलेला आहे व नंतरचा, समुदायवाद हा ऐहिक वा वैज्ञानिक स्वरूपाचा असून प्रगतीचा मार्ग खुला करणारा आहे, असा दावाहि कांहीं वेळेला केला जातो. ह्या दोन प्रकारच्या समुदायवादी विचारसरणींत फरक आहे हें नाकारण्याचें कारण नाहीं. तात्विक दृष्ट्या त्यांत कांहीं तथ्यहि आहे. पण आज आपण ज्या परिस्थितींत आहोंत तिचा विचार केल्यास व्यावहारिक पातळीवर हा फरक अर्थशून्य ठरतो असेंच म्हणावें लागतें. अजूनहि आमचें सामाजिक जीवन बव्हंशीं व्यक्ति-स्वातंत्र्य-पूर्व काळातलेंच आहे. व








यावर आधुनिक तंत्रविद्या झपाट्यानें लादली जात आहे. यांतून विविध प्रकारचे सामाजिक ताण निर्माण होत आहेत. आणि भूतकालीन "सुवर्णकालाचीं स्वप्नें पहाणारे" वा "भविष्यकालीन स्वर्गाचीं चित्रें रंगविणारे" असे दोनहि गट या सामाजिक ताणांचा व कलहांचा आपापल्या कार्यासाठीं उपयोग करून घेत आहेत ! हे दोन गट देशांत परस्परविरुद्ध भूमिकेवर उभे राहिलेले प्रामुख्यानें दिसतात. आमच्या राजकारणांतहि एकमेकांविरुद्ध वाढत असलेल्या दोन महत्त्वाच्या शक्ती ह्या या दोन प्रकारच्या आहेत. यांतील कोणत्याहि बाजूचा विजय होणें लोकशाहीला धोक्याचें आहे आणि म्हणून त्यांच्या संबंधानें कोठलीहि एकांगी प्रतिक्रिया ही धोक्याची ठरूं शकते. आम्ही भविष्याकडे लक्ष दिलें पाहिजे इतकेंच नसून भविष्यकालीन आशा-आकांक्षांचा योग्य अर्थ लावण्याची कुवतहि आमच्यांत निर्माण झाली पाहिजे ही आजची खरी गरज आहे.

## जात आणि वर्ग यांचें भिन्नत्व

राजकीय जीवनांत या वाढत असलेल्या दोन शक्ती व्यावहारिक नसून बव्हंशीं वैचारिक पातळीवरच आहेत. 'जात' आणि 'वर्ग' या दोन भिन्न कल्पना आहेत ही एक साधी समाजशास्त्रीय बाब आहे. तथापि वर्गहिताचा पुरस्कार करणारे कित्येक वेळां जातीय भावनांचा पाठिंबा घेतात व त्यांस उत्तेजनहि देतात. त्या बरोबरच जातीय भावनांचा लाभ घेणारे अथवा धर्माचा पुरस्कार करणारे आर्थिक विकास वा अन्य सामाजिक विषयांवर बोलतांना वर्गीय विचारसरणीचा आधार घेतांना दिसतात ! अशा प्रकारें या दोहोंतील सीमारेषा नाहींशी होते आणि सर्व प्रकारच्या प्रत्यक्ष वा संभाव्य भावनांचा आपल्या यशप्राप्तीसाठीं दोनहि गट मोकळेपणानें उपयोग करून घेत असलेले दिसतात ! यामुळेंच त्यांतील कोणत्याहि गटाला अलग काढून त्यावर हल्ला केल्यानें राष्ट्रीय ऐक्याची वाढ होण्याऐवजीं दुसऱ्या बाजूचें सामर्थ्य वाढीस लागण्याचा संभव अधिक आहे. विरोधकांत फूट पाडण्याचा तो एक चलाखीचा मार्ग होय असें समजणें अनुभवाने फोल ठरलें आहे. अंतर्गत कलह निर्माण करणाऱ्या विविध मध्ययुगीन शक्तींशी मुकाबला करण्याच्या उपक्रमांत आधुनिक समुदायवाद अधिक शिरजोर होऊन उच्चस्थानावर येण्याचा संभव आहे. म्हणून ऐक्य साधण्याचा योग्य मार्ग, हे दोनहि प्रकार ध्यानांत घेऊन, काढावा लागेल; आणि एक धोका टाळण्याच्या उपक्रमांत दुसऱ्याचें सामर्थ्य वाढीस लागणार नाहीं, अशी दक्षता त्यांत बाळगावी लागेल. असा मार्ग हा केवळ लोकशाहीच्या मूल्यावरच अधिष्ठित असणें शक्य आहे.

## ऐक्य म्हणजे लादलेला एकतंत्रीपणा नव्हे

आजच्या सामाजिक परिस्थितींत आढळणारे कांहीं ताण हे परंपरागत जीवनपद्धतीस धक्का बसल्यामुळें निर्माण झालेले असणें शक्य आहे. त्या दृष्टीनें ते अटळहि आहेत. कोणताहि सामाजिक बदल करावयाचा म्हणजे असे ताण निर्माण होणारच. अशा बदलाची गती प्रयत्नपूर्वक वाढविल्यानें ते अधिकच वाढणें शक्य आहे. या दृष्टीनें त्यांचें स्वागतच करावें लागतें. होत असलेल्या विकासाच्या अनुषंगानें या विविध विरोधी प्रतिक्रियांना वाट मोकळी करून दिल्यास भावी लोकशाहीचा पाया अधिक स्थिर आणि भक्कम होणें शक्य आहे. मतभेदांतील रचनात्मक सामर्थ्य त्यायोगानें उपयोगांत आणतां येईल. राष्ट्रीय ऐक्याच्या प्रश्नाची येथें सुचविलेली पुनर्मांडणी या भूमिकेशी सुसंगत आहे. राष्ट्रीय ऐक्य साधणें म्हणजे सर्व मतभेद नष्ट करणें होय, असें कोणीहि सुचविलें नाहीं. ऐक्य म्हणजे लादलेला एकतंत्रीपणा नव्हे. ऐक्याची उभारणी दीर्घकालीन, सतत परिश्रमांतूनच, करावी लागेल. व ती करीत असतांना लोकशाही दृष्टिकोनाचा स्पष्टपणें पुरस्कार करणें हेंच उचित होय. या सर्व विवेचनावरून आमच्यांत दुही माजविणाऱ्या शक्तींचा अर्थ अधिक व्यापक स्वरूपाचा करणें आवश्यक आहे ही गोष्ट स्पष्ट होते. वर्गीय वा अन्य समुदायवादी विचारसरणींचा जात, भाषा व धर्म यांच्या बरोबरच अशा फुटीर शक्तींत अंतर्भाव करावा लागतो. जात, भाषा, धर्म, इत्यादि शक्ती पुष्कळ कालपर्यंत अस्तित्वांत आहेत आणि अनेकांच्या अतिशय खोल भावना त्यांत रुजलेल्या आहेत. उलट, वर्गीय वा तत्सम विचारसरणी या आज तरी अनेक संसदीय मार्गांनीं भावनांचा उद्रेग निर्माण करणें व त्याचा उपयोग करून घेणें या तंत्राचा अवलंब करीत आहे. आम्हांला विभागणाऱ्या शक्ती आज अत्यंत बलवान्










आहेत असें जाणकार लोकांचें मत आहे. आणि त्या योगानें सामाजिक विघटनाचा धोका आजवर केव्हांहि नव्हता इतक्या मोठ्या प्रमाणांत आमच्यापुढें उभा आहे असें म्हटलें जात आहे. हें खरें असेलहि, परंतु हा दृष्टिकोन कांहीं प्रमाणांत तरी एकांगी आहे असें मला वाटतें. जात, भाषा, धर्म, इत्यादि शक्तींना मिळालेली चालना ही कांहीं प्रमाणांत तरी एक राज्य, वहातुकीच्या आणि दळणवळणाच्या साधनांचा विकास, नियोजित आर्थिक विकासाचा कार्यक्रम, यांत अंतर्भूत होणाऱ्या ऐक्यवर्धक शक्तींच्या वाढत्या प्रभावामुळें मिळाली आहे असें म्हणावें लागतें. कोंडलेल्या समाजजीवनांत या शक्तींना कोणतेंहि आव्हान नव्हतें, त्यामुळें त्या सुप्त राहिल्या व त्यांचा विशेष प्रभाव दिसला नाहीं. सामाजिक जीवनांत आतां झपाट्यानें बदल होऊं लागल्या कारणानें या शक्तींतील धोकाहि आम्हांस अधिक प्रमाणांत दिसूं लागला आहे. आजवर सामाजिक परिस्थितींतील बदल आणि प्रत्यक्ष टीका असा दुहेरी हल्ला त्यांना सहन करावा लागला. या हल्ल्याची केवळ प्रतिक्रिया म्हणून त्यांच्यांत थोडीबहुत वाढ झाली असणें स्वाभाविक आहे. अर्थात् ही वाढ अनिष्ट आहे हें वेगळें सांगण्याची गरज नाहीं.

## दोन शक्तींचा गोंधळ

गतकालांत ज्यांचीं बीजें रुजलेलीं आहेत असा समुदायवाद आणि आधुनिक समुदायवाद यांतील फरक बव्हंशी तात्त्विक आहे. व्यावहारिक पातळीवर त्याला विशेष महत्व नाहीं हें मी वर म्हटलेंच आहे. दोनहि दृष्टिकोन मोकळेपणानें एकमेकांच्या भूमिकांचा अवलंब करीत असतांना दिसतात. सत्यनारायणाच्या महापूजेंत 'ऐतिहासिक' विरोधविकासवादावर व्याख्यानें होतात आणि धार्मिक विचारसरणी 'भौतिक विकासाची' भाषा बोलूं लागते. अशा प्रकारें या दोनहि शक्ती आजचा गोंधळ अधिकच वाढवीत आहेत हें स्पष्ट आहे. पण त्याबरोबरच एका अर्थानें हें त्यांच्या दुर्बल-तेचें लक्षण आहे असें म्हटलें पाहिजे. बहुसंख्य जनतेच्या मागासलेपणामुळें बौद्धिक पातळीवरून आपली भूमिका पुढें मांडण्याला महत्त्वाच्या मर्यादा पडतात आणि त्यामुळें विचार वा चर्चा याऐवजीं आपल्या विचारसरणीच्या व्यवहारांत अमर्याद संधि-साधूपणाची कांस धरावी लागते ! उलट सामाजिक जीवन झपाट्यानें बदलत असल्यानें परंपरागत धार्मिक विचारसरणी अधिकाधिक अप्रस्तुत असल्याचें स्पष्ट होऊं लागतें. आणि म्हणून ऐहिक साध्याचें महत्त्व ओळखून त्यांचें मंडन करणें धर्माला क्रमप्राप्त होतें. राष्ट्रीय ऐक्याचा मार्ग शोधून काढण्याच्या उपक्रमांत या दोनहि शक्तींचा एकत्र विचार करणें जरूर आहे. तथापि आतां त्यांचें विशिष्ट महत्त्व ध्यानांत यावें या-साठीं त्यांचें पृथक् विश्लेषण मी थोडक्यांत करणार आहे.

## जातीयप्रवृत्तींशीं समझोता

जातीय, भाषिक वा धार्मिक भावना अत्यंत खोलवर रुजलेल्या आहत हें उघड आहे. परंतु त्यांचा राजकीय आविष्कार ही अलीकडची घटना आहे. हा आविष्कार अधिकाधिक तीव्र होत जाण्याच कारण ध्यानांत यावें यासाठीं ब्रिटिश राजवटींतील सत्तांतराचा विचार करणें जरूर आहे. राष्ट्रीय स्वातंत्र्य प्राप्त होतांना हा सत्तांतराचा क्रम भंगला गेला नाहीं, उलट स्वातंत्र्य-प्राप्ती हा त्या क्रमांतील एक सर्वोच्च बिंदू होता हें सहज सर्वमान्य होण्यासारखें आहे. राष्ट्रीय आंदोलनामध्यें राज्य-कर्त्यांवर " फोडा आणि झोडा " या नीतीचा अवलंब करण्याचा आरोपहि अनेकवार केला गेला होता. परंतु तूर्त आपणांस तिकडे वळण्याची गरज नाहीं. या ठिकाणीं सत्तांतराचा क्रम कशारीतीनें सुरू झाला व विकास पावत गेला या विषयींच प्रामुख्यानें विचार करावयाचा आहे. या बाबतींत प्रथम आरंभ स्थानिक पातळीवरून झाला आणि हळूहळू तो प्रादेशिक पातळीपर्यंत विकास पावला ही गोष्ट सुपरिचित आहे. तथापि राष्ट्रीय स्वातंत्र्याकडे लक्ष देणाऱ्या ध्येयवाद्यांनीं अशा रीतीनें क्रमशः सुरू झालेल्या या बदलाकडे दुर्लक्ष केलें, किंबहुना त्याची निर्भर्त्सना केली हेंहि तितकेंच प्रसिद्ध आहे. आमच्या स्थानिक स्वराज्यसंस्था, लोकलबोर्डें इत्यादींची आम्ही किती उपहासपूर्वक थट्टा करीत होतों हें सर्वांच्या स्मर-णांत आहेच. या संस्था आपआपल्या मर्यादित क्षेत्रांत देखील सामाजिक जाणिवा वा गुण या संबंधींचें शिक्षण देऊं शकल्या नाहींत; परंतु उलट त्या थट्टेचा विषय बनल्या आणि बहुतेक ठिकाणी प्रतिगामी जातीय शक्तींनीं त्यांचा कबजा घेतला. एकदां राष्ट्रीय पातळीवर सत्ता प्राप्त झाली म्हणजे या खालच्या पातळींवरील दोष सहज सुधारतां येतील या भावनेमुळें










लोकशिक्षणाची ही संधी आम्ही दवडली. पुढेंपुढ आमचें लक्ष या संस्थांकडे वळलें हें खरें आहे, कारण त्यांचें कार्यक्षेत्र हें जनतेच्या अत्यंत निकटचें व तिला सहज समजणारें असें आहे. परंतु हें लक्ष वळतांना देखील राजकीय पाठिंबा मिळविण्याचें एक साधन म्हणूनच त्यांच्याकडे पाहण्यांत आलें. आणि यामुळें त्यांच्यांत वर्चस्व गाजविणाच्या इच्छेंतून राष्ट्रवादी आंदोलनांना येथें प्रभावी बनलेल्या जातीय शक्तीशीं व प्रवृत्तीशीं समझोता करावा लागला. अशा प्रकारें राष्ट्रीय आंदोलनाच्या योगानें स्थानिक पातळीवरील अनिष्ट प्रवृत्तींना आळा घातला जाण्याऐवजीं त्या प्रवृत्तीच राष्ट्रीय आंदोलनांत शिरल्या आणि स्थानिक पातळीवर अधिक मजबूत झाल्या. स्थानिक पातळीवरून प्रादेशिक पातळीवर आक्रमण करण्यासाठीं त्यांना भाषिचें साधन प्राप्त झालें, व जातीय शक्ती प्रादेशिक पातळीवरहि दिसूं लागल्या ! धर्माशीं निगडित असल्या तरीदेखील जातीय शक्ती राष्ट्रीय पातळीवर आढळत नाहींत. एक भाषिक प्रदेशापर्यंत म्हणजे प्रादेशिक किंवा आजच्या राज्याच्या ( स्टेट ) पातळीपर्यंत त्यांच्यांतील दुहीची वा कलहाची मजल पोचूं शकते हें स्पष्ट आहे.

### प्रत्येक घटकराज्याला जातीयतेचा धोका ?

भाषिकराज्यांच्या स्थापनेमुळे फुटीर प्रवृत्तींना उत्तेजन मिळालें नाहीं असें मानणारांनी हीं राज्यें प्रस्थापित झाल्यामुळें प्रादेशिक वा राज्यांच्या पातळीवर संघटन वाढलेलें नाहीं, ही गोष्ट ध्यानांत घेणें जरूर आहे. प्रत्येक राज्यांत फुटीर प्रवृत्ती दिसत आहेतच. संघटित जाती वा टोळ्या एकमेकांविरुद्ध कलह करतात व त्या योगानें लोकशाहीच्या संस्थात्मक कार्यावर ताण पडतो हें खरें आहे. पण त्याबरोबरच कोणतीहि विशिष्ट जात कोणत्याहि राज्यांत बहुसंख्येनें अस्तित्वांत नाहीं ही एक महत्त्वाची गोष्ट आहे. म्हणून कोणतेंहि भाषिक राज्य ज्याप्रमाणें जातीय तर्कशास्त्रावर संघटित व प्रबल होऊं शकत नाहीं, त्याच प्रमाणें धार्मिक शक्तीहि संघटित व प्रबल होणें शक्य नाहीं. तात्पर्य, भाषिक वा धार्मिक विचारसरणींना राजकीय क्षेत्रांत अधिकाधिक प्रभावी व्हावयाच झाल्यास जातीयवादाशीं झगडावें लागेल हें स्पष्ट आहे. जातीय भावनांनीं घटक राज्यांत अधिकार गाजविण्याच्या आशेनें भाषिकतेचा आश्रय घेतला असणें शक्य आहे, पण भाषिक राज्यें प्रस्थापित झाल्यानंतर या भावनांनीं आपल्या मर्यादा स्पष्टपणें ध्यानांत घेऊन इतरांच्या गरजांशीं आपल्या मागण्या जुळवून तरी घेतल्या पाहिजेत किंवा ज्या घटक राज्यांच्या पातळीवर वर्चस्व गाजविण्याची महत्त्वाकांक्षा बाळगिली त्या घटक राज्यांच्या विभजनाला तरी जबाबदार ठरलें पाहिजे. जातीय भावनेंतील यापुढील महत्त्वाचा धोका म्हणजे तिच्याकरवीं होऊं शकणारा विविध राजकीय पक्षांचा वापर हा होय. देशांतील बहुसंख्य राजकीय पक्ष प्रादेशिक पातळीवर आढळतात याचेंहि हेंच मर्म आहे. आमच्या संघराज्यांतील प्रत्येक घटक राज्याला अशा प्रकारें जातीयतेपासून धोका निर्माण झाला आहे.

### ऐक्य आणि भाषा

राष्ट्रीय ऐक्याच्या दृष्टीनें खरा महत्त्वाचा धोका भाषेच्या क्षेत्रांत आहे असें कांहींचें म्हणणें आहे. सर्वसामान्य सांस्कृतिक परंपरा एकच असतांना भाषिकभेदानें युरोपमध्यें अनेक निरनिराळीं राज्यें निर्माण केलीं. नवीं राज्यें निर्माण करण्याच्या उपक्रमांत यशस्वी झालेल्या धार्मिक राष्ट्रवादाला भाषिक भावनांनीं पाकिस्तानमध्यें अत्यंत मोठा धोका दिला. गेल्या कांहीं वर्षांत या भावनेचे कित्येक खेदजनक आविष्कार आमच्याहि प्रत्ययास आले. यामुळें भाषिक भावनांविषयीं अनेकांना चिंता वाटणें स्वाभाविक आहे. कांहींनीं तर भाषिक राज्यें निर्माण करण्याचें गेल्या कांहीं वर्षांतील धोरण मुळांतच चुकलेलें होतें व म्हणून तें बदललें पाहिजे, अशी मागणी करण्यास आरंभ केला आहे !

भाषिक राज्यांची निर्मिती कांहीं प्रमाणांत अपरिहार्य होती असें मानावयास हरकत नाहीं. त्या बाबतींत झालेले कलह वा निर्माण झालेली कटुता उद्भवली नसती तर बरें झालें असतें असें फार तर आतां म्हणतां येईल. बिचकत बिचकत, आढेवेढे घेऊन, जें निर्माण केलें आहे तें आतां योग्य रीतीनें व शहाणपणानें चालविण्याचा प्रयत्न केल्यास फारशी काळजी बाळगण्याचें कारण नाहीं. भाषिक क्षेत्रांतील भविष्यकाळचा खरा धोका हा एकूण राष्ट्रांतील भाषिक परिस्थितीमुळें कांहीं घटकांपासूनच निर्माण होऊं शकेल असें वाटतें. देशांतील सर्व भाषा या अल्पसंख्यांकांच्या भाषा आहेत आणि राजकीय वा राष्ट्रीय








गरजांसाठीं देखील त्यांतील कोणत्याहि एक विशिष्ट भाषेला प्रमाणाबाहेर महत्त्व दिल्यास धोका निर्माण होणें शक्य आहे. दुसरी भाषा लादल्यामुळें स्वभाषेच्या विकासांत अडथळे निर्माण होतील, असें वर्तन कोणत्याहि राज्यांत होतां कामा नये, ही गरज प्रथम ध्यानांत घेणें जरूरीचें आहे. याचा अर्थ सर्व देशांतील दळणवळणासाठीं एखादी सामान्य भाषा वापरावी लागणार नाहीं असा नव्हे. पण याबाबत कांहींसें सबूरीच धोरण हेंच उचित ठरेल. आर्थिक विकासामुळें देशांतील निरनिराळ्या भागांत लोकांची ये-जा अधिकाधिक प्रमाणावर होणें अपरिहार्य आहे, आणि त्या योगानें सामान्य भाषेची गरज अधिकाधिक लोकांना वाटूं लागणें ही गोष्ट अटळ आहे. अशा तऱ्हेची सामान्य राज्यभाषा घटनेंत सांगितली आहे. परंतु आज कांहींना त्यावेळच्या वादामुळें घटनेंतील या तरतुदीसंबंधी शंका वाटते. घटनात्मक तरतुदीपासून सामान्य भाषेचा भावनात्मक स्वीकार करण्याच्या वस्तुस्थितीपर्यंतचा विकास संथपणानें आणि कोणतेहि कलह निर्माण न करितां झाला पाहिजे, तरच सामान्य भाषा परिणामकारक रीतीनें अस्तित्वांत येऊं शकेल. तसें न झाल्यास ती अस्तित्वांत येणें अशक्य होऊन जाईल.

## सामान्य भाषा हळूहळू निर्माण होत जाईल.

या दृष्टीनें विचार केल्यास भारतीय भाषिक जीवनांतील दुसराहि एक महत्त्वाचा घटक ध्यानांत घेणें जरूरीचें ठरतें. आमच्या सर्वच महत्त्वाच्या भाषा विकासाच्या एक विशिष्ट अवस्थेंत आहेत. इतरांच्या मानानें आधुनिक जीवनाच्या गरजांच्या दृष्टीनें खूप विकास पावलेली अशी भाषा त्यांत एकहि नाहीं. भविष्यांत एकाद्या भाषेचा असा विकास होऊ शकेल असें मानण्यांत विशेष अर्थ नाहीं. कारण बहुतेक सर्व संशय या भूमिकेतून निर्माण होतात. शिवाय भाषेचा कृत्रिम रीतीनें विकास करण्याच्या बाबतींत आमच्याकडे प्राचीन काळीं पाली व प्राकृत यांच्या बाबतींत झालेल्या प्रयोगांचा अनुभव ध्यानांत घेणें जरूर आहे. आणि तो प्रयोग ज्ञानक्षेत्र कितीतरी मर्यादित असतांना झाला होता ! शिवाय लहान व भाषिक दृष्टीनें एकजिनसी असलेल्या देशांच्या अनुभवावरून आमचा फारसा फायदा होण्याचा संभव नाहीं. देशांत आज केवळ गुजराती, मराठी, बंगाली वा तामिळ, अशी एकच भाषा असती तर हा प्रश्न कितीतरी सुलभ झाला असता. आमच्याकडे अनेक निरनिराळ्या भाषा आहेत आणि बौद्धिक दृष्टीनें सर्वांना शिकावीशी वाटेल अशी एकहि त्यांत नाहीं. यामुळें सबूरीचें धोरण हेंच उचित ठरेल. या म्हणण्याचा थोडक्यांत अर्थ सांगावयाचा म्हणजे आमच्या परिस्थितींत सामान्य भारतीय भाषा ही राष्ट्रीय ऐक्याची प्राथमिक गरज ठरूं शकत नाहीं. ज्या प्रमाणांत ऐक्याची भावना विकास पावेल त्या प्रमाणांत सामान्य भाषा हळूहळू निर्माण होत जाईल हीच भूमिका अधिक योग्य ठरते.

## भाषिक राज्यांच्या मर्यादा

केवळ भाषिक राज्यें म्हणून घटक राज्यांची पुनर्रचना झाल्यानें देशांतलि कोणतेंहि भाषिक राज्य हें निर्भेळ वा शुद्ध स्वरूपांत भाषिक म्हणतां येण्यासारखें नाहीं, ही वस्तुस्थिती झांकता येणार नाहीं. प्रत्येक राज्यांत अन्यभाषिक अल्पसंख्यांक आहेतच, आणि आर्थिक विकासाबरोबरच त्यांची संख्या दिवसेंदिवस वाढत जाण्याचा संभव आहे. शिवाय भाषिक राज्याच्या दृष्टीनें बोलावयाचें म्हटल्यास त्यांच्या आजच्या भौगोलिक मर्यादा व तीं ज्यापासून स्फूर्ति घेऊं पाहातात अशा ऐतिहासिक राज्यांच्या वा साम्राज्यांच्या मर्यादा एक नाहींत. यामुळें सर्व राष्ट्राच्या ऐक्याला जसा ऐतिहासिक आधार नाहीं तसाच भाषिक राज्यांनाहि नाहीं. याखेरीज कोणत्याहि भाषिक राज्याला केवळ आपल्या प्रयत्नांनीं दारिद्र्याचा प्रश्न सोडविणें शक्य नाहीं. तसें पाहिल्यास हा प्रश्न कांहीं मर्यादित प्रमाणांपलीकडे कोणतेंहि एखादें राष्ट्र देखील सोडवूं शकत नाहीं. सुबत्तेसाठीं सर्व जगाचा विचार करावा लागतो ही गोष्ट सर्वांनी आतां मान्य केली आहे. यामुळें देशाच्या दृष्टीनें बोलावयाचें झाल्यास सुबत्तेचा प्रश्न राष्ट्रीय पातळीवरूनच सुटण्याचा संभव आहे. ही सर्व पार्श्वभूमि ध्यानांत घेतल्यास देशांतील निरनिराळ्या सर्व भाषांना आपला विकास करण्याचें स्वातंत्र्य संपूर्णपणें कां देतां येऊं नये हें कळणें कठीण आहे. अशा विकासाची इच्छा विविध भाषिकांनीं बाळगणें स्वाभाविक आहे. फक्त त्या इच्छेची भाषिकवादाच्या विकृत स्वरूपांत परिणति होऊं देतां कामा नये. आणि यासाठीं भाषिकवादी प्रवृत्तींचा ऐक्याचें संवर्धन करणाऱ्या शिक्षण, आर्थिकविकास, संरक्षण व शासन या क्षेत्रांत



अनुक्रमणिका






प्रवेश होऊं देतां कामा नये. अखिल भारतीय स्वरूपाच्या शासकीय नोकऱ्या, मग त्या मुलकी असोत वा लष्करी असोत, त्याचें भारतीय स्वरूपच कायम राहिलें पाहिजे. देशांतील कोठल्याहि गुणी माणसाचा देशाच्या सेवेसाठीं कोठेंहि उपयोग करून घेणें शक्य असलें पाहिजे. या नोकऱ्यांत देखील भाषिक वाटा ( Quota ) असावा हें म्हणणें अत्यंत धोक्याचें व हानिकारक आहे. उच्च शिक्षण व तंत्रविद्या या क्षेत्रांतहि कोणाहि गुणी व्यक्तीला सर्वतोपरी वाव मिळाला पाहिजे. लोकशाही ऐक्याच्या या कल्पनेंत स्वातंत्र्य रक्षणासाठीं वा कोणत्याहि बाह्य शत्रूचा मुकाबला करण्यासाठीं एकत्र येणें ही गोष्ट अंतर्भूत होते आणि त्या करितांहि वरील दृष्टिकोन अत्यंत आवश्यक आहे. हें एकदां मान्य झालें म्हणजे ऐक्याचा व उत्साहाचा विविधतेच्या वाढीशी मेळ घालतां येऊं शकेल आणि सामाजिक व सांस्कृतिक जीवन त्यायोगें अधिक संपन्न होईल अशी आशा बाळगतां येते.

## मग इंग्रजी भाषेचें स्थान कोणतें ?

येथवर चर्चिलेल्या पार्श्वभूमीवर साहजिक निर्माण होणारा अत्यंत महत्त्वाचा प्रश्न म्हणजे देशांतील इंग्रजी भाषेचें स्थान हा होय. अलीकडील कांहीं घटनांवरून याबाबत अधिक वास्तववादी दृष्टिकोन स्वीकारला जाऊं लागल्याचें दिसत आहे. आणि हें साहजिकच आहे. शासन आणि उच्च शिक्षण यासाठीं इंग्रजीऐवजीं भारतीय भाषेचा उपयोग समाधानकारक रीतीनें होणें हा कालाचा प्रश्न आहे, आणि याबाबत उतावीळपणानें कांहीं केल्यास त्यासाठीं अत्यंत मोठी किंमत द्यावी लागेल, इतकेंच नव्हे तर त्या योगानें झपाट्यानें होणाऱ्या आर्थिक विकासाच्या मार्गांत महत्त्वाचे अडथळेहि निर्माण होतील. विज्ञान आणि तंत्रविद्या यांच्या क्षेत्रांत इंग्रजीची गरज आहे ही गोष्ट या दृष्टीनें सर्वच मान्य करतात. तथापि या प्रश्नाचा थोडासा बारकाईनें विचार केला पाहिजे. भारतीय राज्यघटनेंत हिंदीच कार्य हें सामान्य म्हणजे राष्ट्रीय भाषेचें कार्य समजण्यांत आलेलें नाहीं. हिंदी ही दोन घटकराज्यें वा संयुक्त राज्य आणि घटकराज्य यांच्या एकमेकांशीं होणाऱ्या व्यवहारासाठीं उपयुक्त भाषा म्हणून स्वीकारली गेली आहे. हिंदी ही सर्व देशांतलि साहित्याची सामान्य भाषा होऊं शकेल व अशा रीतीनें भावनिक ऐक्याला मजबुती आणण्यासाठीं तिचा उपयोग होईल, अशी आशा फारशी बाळगतां येत नाहीं. अन्य भाषिक प्रदेशांमध्यें हिंदीतून ललित लिखाण केलें जाईल अशी कल्पनाहि करितां येत नाहीं. भावनिक जीवन, मानवी मूल्यें व ध्येयें यांचे साहित्यांतील विविध आविष्कार हे निरनिराळ्या प्रदेशांतील प्रादेशिक भाषांतच होत राहणें अपरिहार्य आहे, आणि हे आविष्कार जर सतत अधिकाधिक उच्च, संवेदनक्षम व सखोल होणें जरूर आहे असें मानलें, त्यांच्या योगानें प्रादेशिक परिस्थिति व अनुभव यांच्या ऐवजीं मानवीं मूल्यें व भावना यांचीच जोपासना झाली पाहिजे असें म्हटलें, तर त्यासाठीं अनुभवाचीं, आकलनाचीं व भावनिक जीवनाचीं क्षितिजें अधिकाधिक विस्तारित जाणें जरूर ठरतें. ही गोष्ट अन्य भाषेंतील साहित्याचाहि परिचय असल्यावांचून साधणें शक्य नाहीं. या दृष्टीनें इंग्रजी ही एक अवश्य आणि महत्त्वाची भाषा आहे. तिच्या योगानें मानवी अनुभवाचीं अत्यंत विशाल दालनें आम्हांला खुलीं होऊं शकतात. कदाचित् ही गोष्ट मूठभर लोकांपुरतीच खरी ठरेल; परंतु कोणत्याहि समाजांत अशा तऱ्हेचें सर्जनशील कार्य करणारे मूठभरच असणार व राहणार हें उघड आहे. सामाजिक जीवन विभागणाऱ्या शक्तींशीं मुकाबला करीत असलेल्या समाजानें ऐतिहासिक कारणामुळें मिळालेला हा महत्त्वाचा इंग्रजीचा वारसा टाकून देण्याचें कारण नाहीं. तात्पर्य, उच्चशिक्षणात्मक सोयींचा, आर्थिक विकासाचा, सर्जनशीलतेचा, वा भावनिक ऐक्याचा विचार करावयाचा म्हटल्यास इंग्रजी कायम राखण्याच्या दिशेन भावी प्रगति झाली पाहिजे हें निश्चितपणें सूचित होतें यांत शंका नाहीं.

## संक्रमणाचा काल अनिश्चित

असें म्हटल्याबरोबर सामान्यतः विचारण्यांत येणारा प्रश्न म्हणजे इंग्रजी कायमचीच राखावयाची कीं काय हा आहे. हा प्रश्न माझ्या परिचयाचा आहे. या प्रश्नांतून निर्माण होणारे विविध उपप्रश्न हेहि सर्वांच्या परिचित आहेत. ते सामान्यतः भावनांच्या पातळीवरच उपस्थित केले जात आहेत. यामुळें अनेकदां या वादांत न पडणेंच शहाणपणाचें होय असें वाटूं लागतें. माझ्या समजुतीनें याबाबतची सर्व चर्चा एका विशिष्ट चाकोरींत शिरल्यासारखी झाली आहे. ती तशी

शिरण्याचें मूळ कारण या प्रश्नाची मांडणी हें होय. ही मांडणी सामान्यतः "इंग्रजी कीं भारतीय भाषा" अशा स्वरूपांत केली जाते आणि यावरून लागलीच एकीऐवजीं दुसरी ताबडतोब आणणें हें साध्य म्हणून पुढें मांडण्यांत येतें. मग तसें करण्याच्या केवळ तांत्रिक स्वरूपाच्या गरजांवर लक्ष केंद्रित होतें, सचिवालयांत लघुलेखक, टंकलेखक किती हवेत, यंत्रें किती लागतील, विद्यापीठांना पाठ्यपुस्तकें कोणतीं हवींत, शिक्षक किंवा प्राध्यापक यांना भारतीय भाषांतून शिकविण्यासाठीं तयार करावयास किती वेळ लागेल. नवी सामान्य परिभाषा समित्या नेमून तयार होऊं शकेल कीं नाहीं, इत्यादि गोष्टींकडे आम्हीं हें लक्ष दिलें आहे. आणि या सर्वांचा परिणाम म्हणून अखेरीस साधनसामग्री व प्रयत्न यांचा भरपूर अपव्यय पदरीं येण्याचा संभव आहे. इंग्रजी ऐवजीं भारतीय भाषा यावी ही कल्पना ठीक आहे, पण एका भाषेऐवजीं दुसरी येणें म्हणजे या संबंधीची तारीख नक्की करणें नव्हें. इंग्रजी ऐवजीं भारतीय भाषा ही विशिष्ट स्वरूपाच्या विकासक्रमाचा अंतिम परिणाम म्हणून येऊं शकेल. भाषा शुद्धस्वरूपांत कायम राखण्याचा आग्रह ही भाषेच्या विकासांतील अत्यंत महत्त्वाची धोंड आहे हें एकदां मान्य केलें म्हणजे बराच काळपर्यंत इंग्रजी आणि भारतीय भाषा ह्या एकमेकींशीं सहकार्य करीत बरोबर जाणें आवश्यक बनतें, आणि अशा बरोबर जाण्यांतूनच अखेरीस भारतीय भाषा इंग्रजीचें स्थान घेऊं शकेल. दरम्यानच्या संक्रमणावस्थेच्या काळांत दोहोंचा उपयोग हाच योग्य मार्ग ठरतो. हिंदी, मराठी, गुजराती वगैरे भाषा इंग्रजीबरोबर पुष्कळ काळपर्यंत वापरीत गेल्यानेंच इंग्रजीचें स्थान घेण्यास समर्थ बनतील. अशा तऱ्हेचा द्विभाषिक वापर व्यवहार्य व योग्यहि आहे असें म्हणतां येईल. शासनाच्या वा उच्चशिक्षणाच्या क्षेत्रांत त्याचा व्यावहारिक अर्थ निश्चित करणें कठीण नाहीं. असा दृष्टिकोन स्वीकारल्यानें आजच्या भावनात्मक पार्श्वभूमींतून भाषिक प्रश्न बाहेर काढतां येईल आणि बौद्धिक दृष्टीने त्याची चर्चा होऊं शकेल. माझ्या मतें याबाबतींत आजवर राहिली तशीच इंग्रजी भाषा राहूं दे, परंतु त्याबरोबरच भारतीय भाषांचाहि खुलेपणानें उपयोग झाला पाहिजे. ज्या पातळीपर्यंत भारतीय भाषांवर भरहि दिला गेला पाहिजे," ही भूमिका अधिक योग्य ठरते. असे केल्यानें भारतीय भाषांचें अधिकाधिक पुढें जाण्याचें सामर्थ्य क्रमाक्रमानें वाढूं शकेल आणि हें सामर्थ्य वाढविण्यासाठीं त्यांचा विकास करण्याचा प्रयत्नहि नेटानें हातीं घेणें शक्य होईल.

## फाळणीचा भावनिक स्वीकार अवश्य

धर्मभेदानें निर्माण होणारे प्रश्न, मग ते स्थानिक, प्रादेशिक वा राष्ट्रीय पातळीवरील असोत, सर्व देशांतील सामाजिक जीवनावर परिणाम करतात. बहुतेक प्रश्न देशाची फाळणी होण्यास जबाबदार ठरलेल्या धार्मिक राष्ट्रवादाने निर्माण केले आहेत. आणि अजूनहि आमच्यांतील कांहींनी ह्या फाळणीच्या ऐतिहासिक घटनेचा भावनात्मक स्वीकार केलेला नाहीं अशी वस्तुस्थिति आहे. परंतु या बाबतींत इतिहासाचीं चक्रें मागें फिरवितां येणार नाहींत आणि समाजांतील कोणत्याहि जबाबदार गटाला तशी आशाहि वाटत नाहीं. तथापि, धामक राष्ट्रवादानें निर्माण केलेल्या दोन राज्यांतील वस्तुस्थिति आजच्या प्रश्नाकडे पाहण्याच्या आमच्या दृष्टिकोनावर परिणाम करते. कांहींच्या बाबतींत तर यांतील कित्येक प्रश्नांचें आकलनहि त्या स्मृतीनें भारावलेलें आहे. म्हणून निरोगी राजकीय जीवन व व्यवहार निर्माण करण्याच्या दृष्टीनें फाळणीचा भावनिक स्वीकार करणें हाच उत्तम आणि शहाणपणाचा मार्ग आहे असें स्पष्ट म्हणणें जरूर आहे.

## राजकारणांत धर्माचा आविष्कार अनिष्ट

देशांतील ऐक्याच्या दृष्टीनें धर्माचा राजकारणांतील आविष्कार अजूनहि धोक्याचा ठरणें संभवनीय आहे. देशांत निरनिराळे धर्म आहेत आणि त्यावर दृढ श्रद्धा असणाऱ्या लोकांची संख्या लाखांनीं मोजतां येण्यासारखी आहे. यामुळें धर्मश्रद्धेविषयीं सर्वतोपरी आदर बाळगणारा व त्याबरोबरच भावी आकांक्षा व प्रयत्न यांना धर्मापासून अलग काढणारा दृष्टिकोन हाच आजच्या परिस्थितींत उपयुक्त ठरूं शकतो. सामाजिक भावी आकांक्षांचा विचार करतांना त्यांत धर्म आणण्याचें कारण नाहीं. असा दृष्टिकोन स्वीकारल्यांवाचून धर्मामुळें निर्माण होणारे अनेक गुंतागुंतीचे प्रश्न समाधानकारक रीतीनें सुटूं शकणार नाहींत. भाषेच्या योगानें होणाऱ्या विभागणीला धर्मामुळें शह बसतो



अनुक्रमणिका






हें खरें आहे, पण म्हणून भाषिक वादाचा धोका टाळण्यासाठीं धर्म उपयोगी पडेल ही आशा बाळगणें व्यर्थ आहे. निदान एक महत्त्वाचा धर्म हा तरी सर्वत्र एका विशिष्ट भाषेशीं निगडित झालेला आहे. याखेरीज विशिष्ट भाषेशीं संबंध असलेले इतरहि धर्म आहेत. हिंदुधर्मापुरतेंच बोलावयाचें झाल्यास जातिसंस्थेच्या बाबतींतील त्याचें दौर्बल्य हें स्पष्ट आहे. यामुळें धार्मिक भावना अनेकदां वैयक्तिक श्रद्धेपुरतीच मर्यादित राहून ऐक्य भावनेचें संवर्धन करूं शकत नाहीं, तर उलट राजकीय व्यवहारांत शिरूं लागते आणि केवळ बहुसंख्यांकाचा धर्म म्हणून आपलें कांहीं विशिष्ट महत्त्व आहे असा आग्रह धरीत हळूंहळूं लढाऊ प्रवृत्ति निर्माण करूं लागते. तथापि या प्रवृत्तींचा विजय होणें म्हणजे ऐक्याचा प्रश्न सोडविणें नव्हे. उलट त्या योगानें सामाजिक जीवनांत एक अत्यंत खोल स्वरूपाची विभागणीच होणें अपरिहार्य आहे; व तिच्या योगानें सर्व राजकीय स्थैर्याला धोका होण्याचा संभव आहे. त्याशिवाय अल्पसंख्यांक धर्म या प्रवृत्तींमुळें स्वसंरक्षणासाठीं देशाच्या भौगोलिक मर्यादेपलीकडे लक्ष देऊं लागणेंहि असंभवनीय नाहीं हें ध्यानांत घेतलें पाहिजे.

## लोकशाही मूल्यें नैतिक मूल्येंच होत

तात्पर्य, धर्माच्या योगानें निरनिराळ्या फुटीर व लोकशाहीविरोधी प्रवृत्तींना उत्तेजन मिळण्याचा संभव आहे. हें ध्यानांत आल्यानें कांहीं धार्मिक प्रवृत्तींची मंडळी धर्माचें सार शोधण्याच्या कल्पनेमागें लागलेली आढळतात! सर्व-धर्मीयांना एकत्र आणण्याच्या इच्छेनें प्रेरित होऊन नैतिक संदेशहि देऊं लागतात. हे संदेश, आमच्यापुरतें बोलावयाचें झाल्यास, नवे नाहींत. उलट ते परिणामकारक ठरूं शकत नाहींत यासाठीं भरपूर पुरावा आहे. त्याचप्रमाणें ते देणारांची मुळांतील बैठक धार्मिक असलीतरी देखील त्यांना शरणागती व परलोकश्रद्धा याऐवजीं मानवी आणि नैतिक मूल्यें हेंच धर्माचें सार होय ही गोष्ट मान्य करावी लागते. अशा रीतीनें धर्म वगळल्यास नैतिक मूल्यें कायम राहणार नाहींत अशा भावनेंतून धर्माला ऐहिक स्वरूप देण्याची धडपड ते करूं पाहतात. परंतु त्यांची मुळांतील बैठक धार्मिक असल्यानें अखेरीस त्या योगानें परंपरागत धर्मभावनेचें पोषण होतें आणि त्यांचा हेतु असफल ठरतो. उलट त्यांना जें कांहीं म्हणावयाचें आहे तें सर्व लोकशाही दृष्टिकोनांत अंतर्भूत झालेलेंच आहे. कारण हा दृष्टिकोन मुळांत नैतिकच आहे. आणि या दृष्टिकोनांत अंतर्भूत न झालेलें असें जें कांहीं त्याचें म्हणणें आहे तें भावी आशाआकांक्षांना पोषक नसून विरोधक स्वरूपाचें आहे आणि म्हणून तें त्याज्यच म्हटलें पाहिजे. लोकशाहीवरील श्रद्धा ही नैतिक जीवनावरील श्रद्धा होय. आणि तिला धर्माचा पाठिंबा मिळालाच पाहिजे असा आग्रह धरणें हें आवश्यक वा इष्ट ठरण्याचा संभव नाहीं. अनेक धर्म अस्तित्वांत असणाऱ्या आमच्या सामाजिक जीवनांत कित्येक सुप्त कलह साहाजिकच अस्तित्वांत आहेत आणि म्हणून ऐक्य साधावयाचें झाल्यास वैयक्तिक श्रद्धेचें स्वातंत्र्य मान्य करणारा व त्याबरोबरच संघटित वा संस्थात्मक धर्मांनी सामाजिक जीवनांत हस्तक्षेप करतां कामा नये असें निश्चितपणें सांगणारा, दृष्टिकोन हाच आम्हांला उपयुक्त ठरूं शकतो. हा दृष्टिकोन स्वीकारल्यानें नैतिक मूल्यांकड दुर्लक्ष होतें असें म्हणण्याचें कारण नाहीं. नैतिक मूल्यें हीं धार्मिक आधारावरच स्वीकारलीं पाहिजेत हा आग्रह व्यर्थ आहे. हीं मुळीं मानवी मूल्येंच आहेत, तीं मानवानें निर्माण केलेलीं आहेत, आणि त्याबरोबरच धर्म हाहि एक आकलनाच्या वा विकासाच्या विशिष्ट पातळीतील मानवानेंच निर्माण केला आहे हें ध्यानांत घेणें जरूर आहे.

आधुनिक समुदायवादी विचारसरणींचेंहि खरें सामर्थ्य त्यांच्या नैतिक अधिष्ठानांतच आहे. समाजवाद ही देखील वास्तविक पाहतां समतेची म्हणजेच नैतिक विचारसरणी आहे. हें मान्य केलें म्हणजे समाजवादानें व्यक्तीची प्रतिष्ठा वा स्वातंत्र्य यांना नेहमीच मान दिला पाहिजे हें स्वीकारावें लागतें. समाजवादी व्यवहारांमध्यें समुदायवादी विकृति शिरण्याचें महत्त्वाचें कारण म्हणजे वैचारिक भूमिकेला तथाकथित शास्त्रीय स्वरूप देण्याचा त्यांचा आग्रह हें होय. त्या योगानें समाजवाद हा एक सत्ता-पूजक संप्रदाय वा पंथ बनला आहे. इतिहासाचा हा दाखला आम्हीं योग्य रीतीनें ध्यानांत घेतलाच पाहिजे. आमच्या आजच्या अविकसित अवस्थेमध्यें त्याचें महत्त्व कितीतरी अधिकच आहे. या अवस्थेंतील आर्थिक विकासाचें साध्य केवळ समता असून भागणार नाहीं, समतेबरोबरच स्वातंत्र्यावरहि भर दिला गेला








पाहिजे. आणि या दोनहि गोष्टी प्रत्येक व्यक्तीच्या प्रत्ययाला येतील अशा रीतीनें आर्थिक प्रयत्नांची उभारणी झाली पाहिजे. वैयक्तिक पुढाकार आणि सहकार्य, विकास आणि समान विभागणी हीं आर्थिक संघटनेंत एकमेकांशीं जुळविलीं गेलीं पाहिजेत आणि या सर्वांची निरनिराळ्या पातळीवर लोकशिक्षणाशीहि जुळणी झाली पाहिजे.

## लोकशाहीला मिळणारीं आव्हानें

आम्ही उभारत असलेल्या लोकशाहीला अनेक निरनिराळ्या आव्हानाशीं सामना द्यावा लागणार आहे. जात, भाषा, धर्म, आधुनिक समुदायवाद, हीं तीं आव्हानें होत. जातिसंस्थेमुळें लोकशाही संस्थांच्या व्यवहाराला संघटित गटांतील स्पर्धेचें स्वरूप प्राप्त होतें आणि त्यासंस्थेवर अत्यंत मोठा ताण पडतो. राजकीय पक्षांतील सत्तास्पर्धेवर आधारलेल्या राजकीय जीवनांत जातीय भावनेला अधिकाधिक महत्त्व प्राप्त होऊं लागतें आणि सारेच पक्ष बहुमताचा पाठिंबा मिळविण्यासाठीं प्रभावी जातीय गटांशीं जुळवून घेण्याला प्रवृत्त होतात. ग्रामीण पातळीवरील पुनर्रचनेच्या कार्यांतहि जातीय संस्था अनेक अडथळे निर्माण करतात. या सर्वांवर उपाय म्हणून भूतकाळांकडून जनतेचें लक्ष भावी आशा-आकांक्षांवर केंद्रित करणें आणि त्या प्रत्यक्षांत आणण्यासाठीं त्यांचें योग्य आकलन व आवश्यक प्रयत्न करण्यासाठीं जरूर तो आत्मविश्वास जनतेच्या ठिकाणीं निर्माण करणारा विकासक्रम आखण्याची खरी गरज आहे अशा रीतीनें आखण्यांत येणाऱ्या प्रयत्नांचा लोकशिक्षणाचें एक महत्त्वाचें साधन म्हणून उपयोग झाला पाहिजे. दुसरें आव्हान म्हणजे भाषेचें आव्हान होय. निर्माण झालेलीं भाषिक राज्यें हळूहळू स्वतंत्र राज्यें म्हणून विकास पावण्याची धडपड या आव्हानांतून व्यक्त होते. व या धडपडीचा परिणाम म्हणून सयुक्त राज्यांच्या क्षेत्रांत अधिकाधिक वांटा मिळविण्याचा प्रयत्न यांच्याकडून होण्याचा संभव आहे. या प्रयत्नांना पूर्णपणें विरोध करणें अवश्य आहे. तथापि त्याबरोबरच सर्व भाषांच्या विकासाला पुरेशी संधीहि देणें जरूर आहे. घटक राज्यें, वा सयुक्तराज्य आणि घटक राज्यें यांच्या होणाऱ्या परस्पर व्यवहारांशीं आवश्यक म्हणून स्वीकारावयाच्या सामान्य भाषेचें क्षेत्र या आवश्यकतेपुरतेंच मर्यादित ठेविलें पाहिजे, आणि अशा सामान्य भाषेचा विकास होईतों पर्यंत — कदाचित् त्यानंतरहि — शासन आणि शिक्षण यांचा दर्जा कायम राखण्यासाठीं इंग्रजीच्या स्थानाबद्दल पुन्हां विचार होणें वा तें निश्चितपणें मान्य करणें जरूर आहे. सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे याबाबतींत स्वीकारावयाचा कोणताहि दृष्टिकोन भाषिक प्रश्नाला भावनात्मक पार्श्वभूमींतून बाहेर काढील आणि तो बौद्धिक पातळीवरून सोडविला जावा यासाठीं सर्वांना प्रयत्नशील करील असाच असला पाहिजे. तिसरें महत्त्वाचें आव्हान धर्माचें होय. हें आव्हान स्वीकारावयाचें झाल्यास फाळणीचा भावनात्मक स्वीकार होणें आवश्यक आहे, आणि त्याबरोबरच सर्व सामाजिक व्यवहारांत वैयक्तिक श्रद्धेचें स्वातंत्र्य आणि व्यक्तिस्वातंत्र्याची वा नैतिक मूल्यांची गरज अबाधितपणें स्वीकारणारा ऐहिक दृष्टिकोन हाच एक उपाय आहे. या साऱ्या आव्हानांचा स्वीकार करीत असतांना आधुनिक समुदायवादाचा धोका नेहमीच ध्यानांत ठेवला पाहिजे. वरील निरनिराळ्या आव्हानांतून निर्माण होणाऱ्या भावनांचा उपयोग करून घेऊन त्यांच्या साहाय्यानें स्वातंत्र्य व लोकशाही नष्ट करण्याचा प्रयत्न या समुदायवादाकरवीं होत आहे. हा धोका टाळण्यासाठीं दारिद्र्याचा प्रश्न सोडविण्याचा उपक्रम पुढें नेला पाहिजे पण त्या बरोबरच सामान्य नागरिकाच्या ठिकाणीं बौद्धिक तारतम्ययुक्त आणि आत्मविश्वासपूर्ण दृष्टिकोनहि निर्माण केला पाहिजे.

## निरोगी घटकांचें पोषण

या निरनिराळ्या फुटीर प्रवृत्तींमध्यें कांहीं निरोगी घटक आहेतच आणि म्हणून त्या प्रवृत्तींचा मुकाबला करीत असतांना हे घटक अलग काढून त्यांचें पोषण करणें ऐक्याच्या दृष्टीनें आवश्यक ठरतें. गांवाचा अभिमान, स्वभाषेचें प्रेम वा वैयक्तिक श्रद्धेचें महत्त्व, यामध्यें आक्षेपार्ह असें कांहीं नाहीं. तसेंच आर्थिक समता व न्याय हीं सर्वतोपरी इष्टच ध्येयें आहेत. तात्पर्य, या सर्व भावनांची जोपासना करणें ही आजची एक महत्त्वाची गरज आहे. त्या खेरीज व्यक्तीच्या जीवनाला कोठल्याहि तऱ्हेचीं मुळेंच असूं शकणार नाहींत, आणि हीं मुळें नाहींशी झालीं तर देशप्रेम वा मानवी मूल्यें यांचा अनुभव घेण्याचें सामर्थ्यहि त्याच्या ठिकाणीं असणार नाहीं. तात्पर्य, फुटीर प्रवृत्तींवर हल्ला करीत










असतांना धर्म, भाषा, प्रादेशिकता वगैरे भावनांच्या कांहीं विशिष्ट आविष्कारावरच तो हल्ला आहे ही जाणीव सतत ध्यानांत ठेवणें जरूर आहे.

आमच्या समोरील निरनिराळ्या धोरणांत निवड करण्याचा प्रश्न अशा रीतीनें कठीण वा गुंतागुंतीचा आहे आणि ही निवड देखील सतत गतिमान असलेल्या परिस्थितींत करावयाची आहे. प्रादेशिक अभिमान व उत्साह यांना वाव देत असतांनाच देशाच्या व्यापक ऐक्याची जोपासना करावी लागणार आहे. देशांतील साधन-सामग्रीचा नीट क्षमतेनें उपयोग करीत असतानांच प्रादेशिक असमता नाहींशी करण्याचा प्रयत्न करावा लागणार आहे. ऐहिक राज्याचा पुरस्कार करतांना वैयक्तिक श्रद्धांविषयीं आदर बाळगावा लागणार आहे. पण त्याबरोबरच धार्मिक राष्ट्रवादाची परंपरा नाहींशी करण्याचा व राजकीय जीवनांत धर्माची ढवळाढवळ न होऊं देण्याचाहि प्रयत्न करणें जरूर आहे. राजकीय जीवनांतून धर्म बाजूस सारतांना ऐहिक दृष्टिकोनाबरोबरच नैतिकमूल्येंहि नांदूं शकतात हें आम्हांस सिद्ध करावें लागणार आहे. समतेचा पुरस्कार तर करावाच लागेल. पण त्याबरोबरच विशिष्ट विचारसरणीच्या शब्दप्रामाण्यावर आधारलेले दृष्टिकोन टाळावे लागतील आणि त्यांच्या आश्रयानें निर्माण होणारा लोकशाहीचा धोका नाहींसा करावा लागेल आणि हें सारें आजच्या राजकीय चौकटींतच साधावयाचें आहे. ही चौकट सार्वत्रिक मतदानावर आधारलेली आहे. मताचा हक्क प्राप्त झालेली बहुसंख्य जनता दरिद्री, अडाणी व मागासलेली आहे आणि तिच्यावर नेतृत्व प्रस्थापित करण्यासाठीं निरनिराळ्या पक्षांची व गटांची स्पर्धा सतत सुरू आहे, व लोकशाही कायम राखावयाची म्हटल्यास ती सुरू राहीलहि. हें सारें ध्यानांत घेतलें म्हणजे आमच्या इतिहासांतील अत्यंत धोक्याचीं कांहीं दशकें आमच्यापुढें आहेत असें साहजीकच कोणालाहि वाटेल. परंतु समाजजीवनाचा साकल्यानें विचार केल्यास हीं धोक्याचीं दशकेंच आजवर कधींहि प्राप्त न झालेल्या अशा अत्यंत महत्त्वाच्या संधींचीं दशकेंहि होत असें म्हणावेसें वाटतें आणि या संधींवरच भावीकाळाच्या आशा व आकांक्षा अवलंबून आहेत. त्या साध्य करण्यासाठीं देशाच्या मनोभूमीची उत्तम मशागत होणें जरूर आहे. स्वातंत्र्य व सत्य या मूलभूत मानवी मूल्यांच्या आधारानें आणि व्यक्तीचें प्राधान्य व सार्वभौमत्व स्वीकारणाऱ्या सामाजिक तत्वज्ञानाच्या साहाय्यानेच आजच्या अरिष्टमय परिस्थितींतून भावीकाळासाठीं उज्वल मार्ग काढतां येईल असें वाटतें.

---














श्री. जी. व्ही. कामत-हेळेकर

# तिसऱ्या पंचवार्षिक योजनेंत – किंमत विषयक धोरणाची निकड

१९६०-६१ सालापासून १९६५-६६ सालापर्यंतच्या काळांत ११,६०० कोटी रुपये रकमेची तरतूद तिसऱ्या पंचवार्षिक योजनेमध्यें आहे. पैकीं ४,३०० कोटी रुपये खासगी उद्योगधंद्यांत गुंतविले जाणार आहेत. सार्वजनिक उद्योगधंद्यांत ६,३००कोटी व उरलेले बाराशे कोटी रुपये चालू खर्चाकरितां– म्हणजे नोकरवर्गाचे पगार वगैरेंकरितां-धरले आहेत. येणेंप्रमाणें येत्या पांच वर्षांतील भांडवल– गुंतवणूक १०,४००कोटी रुपये रकमेची होते. राष्ट्रीय मिळकत तीस टक्क्यांनीं किंवा दरसाल पांच टक्क्यांनीं व जनतेची दरडोई मिळकत सतरा टक्क्यांनीं वाढविणें म्हणजे ३३० वरून ३८५ पर्यंत नेणें–हें योजनेचें लक्ष्य आहे. अन्नधान्याबाबत स्वयंपूर्ण बनणें, पोलाद–रसायनें यासारखे ' बेसिक ' उद्योगधंदे विस्तारित करणें, यंत्रें बनविण्याची कुवत स्थिर करणें व देशांतील मनुष्यबळ कामीं लावणें–याहष्टीनें हे प्रयत्न आहेत. उत्तरोत्तर संधीची समानता वाढविणें व मिळकतींतील व संपत्तींतील विषमता कमी करणें, हें योजनेचें उद्दिष्ट आहे.

### भांडवल रिचविण्यावरील ताण

१९५१ ते ६० या दशकांत करण्यांत आलेली भांडवल-गुंतवणूक तिसऱ्या योजनेनें आपल्या पांच वर्षांच्या मुदतींत ठांसून भरली आहे. देशाच्या आवश्यकता, लोकांचें जीवनमान, बेकारीची अवस्था, आणि लोकसंख्येंत पडणाऱ्या भरीचा विलक्षण वेग, या गोष्टी लक्षांत घेतां, हे प्रयत्न थोडकेच आहेत. देशांतील आजचें जीवनमान टिकवायचें झालें तरी यापेक्षां कितीतरी पटींनीं अधिक भांडवल ओतलें गेलें पाहिजे. परंतु एवढ्या मोठ्या प्रमाणावरील भांडवल –गुंतवणुकीमुळें तें ' रिचविण्याच्या क्षमतेवर ' ताण पडतो. पुरेशा प्रमाणांत विकसित न झालेल्या अर्थव्यवस्थेंत– जेथें पूरक घटक व योजना संपूर्ण विकास पावलेलीं नसतात, किंबहुना मुळांत अस्तित्वांतच आलेल्या नसतात,–तेथें मोठी गुंतवणूक रिचविण्याची क्षमता थोडक्याच काळांत गांठली जाते. वाढत्या गुंतवणुकीमुळें अर्थव्यवस्थेवर पडणारा ताण वस्तूंच्या किंमतींच्या हालचालींत दिसून येतो. जादा गुंतवणूक मालाकरितां नव्या मागण्या निर्माण करते; ही मागणी पुरविण्याइतका मालाचा पुरवठा जर होत राहिला नाहीं, तर परिणामीं किंमती वाढण्याची प्रवृत्ति दिसून येते. मागणी व पुरवठा यांचीं पारडीं वर–खालीं असणें, हें नेहमींच योजनाबद्ध विकासाशीं संबंधित असतें. किंमतींतील किंचित् वाढ कदाचित् अनिवार्य असेल, किंबहुना योग्यहि असेल. परंतु किंमती दोन टोकांना झुकत राहण्यामुळें अर्थव्यवस्थेच्या अवस्थेबद्दल काळजी वाटूं लागते. किंमतींतील भयंकर बदलामुळें समाजांतील वेगवेगळ्या गटांना वेगवेगळ्या प्रकारें दुर्दशा प्राप्त होते. हे बदल कमी करण्याचें व किंमतींना स्थैर्य मिळवून देण्याचें धोरण योजनेच्या चौकटींत प्रतिष्ठापित केलें पाहिजे.

योजनेंत कल्पिलेली गुंतवणूक आपल्या राष्ट्रीय मिळकतीच्या चौदा टक्के येते. सांप्रत राष्ट्रीय मिळकतीच्या आठ ते नऊ टक्के रक्कम जनता पैसे शिलकींत टाकून जमा करते; तिसऱ्या योजनेच्या अखेरीस ही टक्केवारी अकरापर्यंत वाढावी, अशी अपेक्षा आहे. यांत कांहीं अंतर राहिलें, तर इतर





अनुक्रमणिका

कांहीं उपायांनीं ह्या शिलकीला शाबूत ठेवलें जाईल. हें शिलकी द्रव्य व भांडवल-गुंतवणूक यांमधील विषमतेमुळें अर्थव्यवस्थेंत ताण निर्माण होतील. विकासाच्या प्रक्रियेंत गुंतवणुकीचा वेग शिलकीच्या वेगापेक्षां जास्त असणें अटळ आहे. शिलक व गुंतवणूक यांमधील विषमता, मागणी व पुरवठा यांतील असमतोलता, या प्रवृत्ति येतीं कांहीं वर्षें राहणारच.

### किमतींवरील नियंत्रण

देशांत योजनेचें पर्व सुरू झाल्यापासून किमतींच्या हालचालीवर नियंत्रण ठेवण्याच्या आवश्यकतेवर भर देण्यांत आला होता. "प्राप्त परिस्थितींत सुयोग्य गणतां येईल अशी मर्यादा निश्चित करणें व प्रत्यक्ष नियंत्रणानें वा सरकारी तिजोरींतून वा अन्य उपायांनीं अन्नधान्याचें उत्पादन आंतबट्ट्याचें होऊं न देणें--- ही एक समस्याच आहे. किंमती स्थिर ठेवण्याच्या धोरणाच्या दृष्टिपथांत ज्याप्रमाणें एक कमाल मर्यादा असावयास हवी, त्याचप्रमाणें एक किमान मर्यादाहि हवी." — असें पहिल्या योजनेच्या मसुद्यांत म्हटलें आहे. अर्थव्यवस्थेवर चलनवाढीचा दबाव पडलेला असेल, त्या काळांत दृष्टि अटळपणें कमाल मर्यादेवरच खिळलेली असणार. किमतींची प्रवृत्ति जर एकसारखी नियंत्रणपद्धतीकडे झुकणारी असेल तर उत्पादकांना व्यापारांतून होणारी मिळकत मर्यादित असेल, अशा वेळीं उत्पादकांचे हितसंबंध सुरक्षित ठेवण्याकरितां व किंमती बाजवीपेक्षां घसरूं न देण्याकरितां स्थिर किमतींची उपाययोजना उपयोगी पडेल. १९५१ ते ५६ या पंचकांत धान्यउत्पादनांत, विशेषतः अन्नधान्य उत्पादनांत, पंचवीस टक्के घट आली. उभ्या ठाकलेल्या प्रत्येक समस्येला तोंड देण्याकरितां उपाय जरी हातीं होते, तरी ते उपाय परस्परांशीं संबद्ध नव्हते. अन्न व निरन्न पिकाच्या किमतींत समानता राखण्याकरितां किमतीविषयींचें एक धोरण आखणें आवश्यक आहे, ही गोष्ट दुसऱ्या पंचवार्षिक योजनेनेंहि उचलून धरली. 'पर्यायी पिकांच्या किमतींत कांहीं सुसंगत परस्परसंबंध असावयास हवा, व हा संबंध असा हवा कीं योजनेच्या आवश्यकतांची भरपाई करणारें पीक काढण्यास उत्पादकांस उत्तेजन मिळेल' असें दुसऱ्या योजनेच्या मसुद्यांत म्हटलें आहे. राखीव सांठे करावेत, आयात-निर्यातीचें प्रमाण जाहीर करावें, सावकारीवर नियंत्रण घालावें—असे अनेक उपाय या योजनेनें सुचविले होते.

किमतींबाबत एक धोरण अवलंबिण्याची आवश्यकता दोन्ही योजनांनीं मान्य केली होती, हें उघड आहे; परंतु एकंदर सर्वसामान्य धोरणांत त्याचा अंतर्भाव कधींच करण्यांत आला नाहीं. धोरण आखण्याची व तें अंमलबजावणींत आणण्याची जबाबदारी इतकी विस्कळीतपणें वाटली होती, कीं पहिल्या योजनेंतील प्रत्यक्ष नियंत्रण व दुसऱ्या योजनेंतील राखीव सांठे निर्माण करण्याच्या कामगिऱ्या यांनीं कांहींच साधलें नाहीं !

### धोरणाच्या अमलबजावणीची जबाबदारी

आतां तिळमात्रहि उशीर न करतां धोरण व त्याची अंमलबजावणी यांची जबाबदारी एका विशिष्ट मंडळावर टाकणें अगत्याचें आहे. पूर्वीच्याच घोषणांचा अभाव तिसऱ्या योजनेंत नाहीं. फरक एवढाच, कीं सांप्रत परिस्थितींत या उपायाची निकड फारच जाणवत आहे. परत योजनेच्या मसुद्यांतूनच उचलू करूं : "भांडवलाच्या गुंतवणुकींत कितीहि आगेकूच केली, तरी दैनंदिन गरजेच्या वस्तूंच्या किंमती सामान्यतः स्थिरच राहतील याकडे लक्ष पुरविणें व तशी तजवीज करणें, हें योजनेचें धोरण आहे." शिवाय 'अन्नधान्याच्या किमतींमुळें समाजांतील द्रव्यदुर्बळ लोकांना फटका बसतो, एवढेंच नव्हे, तर तीमुळें किमतीच्या एकंदर रचनेवरच परिणाम होतो' — यावरहि योजनेच्या मसुद्यांत भर देण्यांत आला आहे. राखीव सांठे ठराविक किमतींत सरकारी यंत्रणेनें, राज्य-व्यवहारांतून








व सहकारी पद्धतीनें हस्तगत करण्याचें उद्दिष्ट योजनेचें अविभाज्य अंग असूं शकेल. किमतींबाबत एक धोरण बाळगणें व किमतींवर नियंत्रण करण्याचें तंत्र- यांतून अनेक गुंतागुंतीच्या समस्या निर्माण होतात. परस्परांशीं न जुळणाऱ्या गोष्टी तोलणें, हें यांत येतें. 'किमती, मिळकती व उत्पादन-खर्च' परस्परांशीं निगडित आहेत. म्हणून योजिलेले नियामक उपाय 'परिणामकारकरीत्या व परस्पर पूरकरीत्या कार्यकारी ठरतील, अशी खबरदारी घेणें आवश्यक आहे.'

याबाबत आतां पुरेशी जाणीव झालेली आहे व गतिशील व सर्वग्राही धोरण स्वीकारण्याची निकड आहे असें सरकारलाहि आतां वाटूं लागलें आहे, हें उघड आहे. नव्या योजनेच्या कार्यवाहीकरितां ही प्रवृत्ति पोषकच आहे.

### दशकांतील किमतींचा चढउतार

गेल्या दशकांतील किमतींची हालचाल कांहीं ठळक बाजूंचें दर्शन घडवते. हीं दहा वर्षें प्रत्येक योजनेच्या काळानुसार पांच-पांच वर्षांत विभागतां येतात. पहिल्या योजनेंत किमती घसरण्याची प्रतीति आली. १९५१ सालीं किमतींचा निदशांक ४३५ होता, तो १९५५ पर्यंत ३६० वर घसरला, म्हणजे सरळसरळ ६५ अंक खालीं आले. १९५२ ते ५५ या सालांत निर्देशांक ३८१ ते ३६१ च्या दरम्यान फेऱ्या मारीत होता. पाऊसपाणी चांगलें झाल्यामुळें शेतकी-उत्पादनांत झालेली वाढ या सर्वांच्या बुडाशीं होती. म्हणून 'दुसऱ्या योजनेच्या उंबरठ्याशीं असतांना किमतींच्या पातळीचा घोर नव्हता; अन्नधान्याच्या किमतींतील पिछेहाटींतून देश बाहेर पडत होता; खर्च आणि गुंतवणूक अगदीं सावकाश हालत होती. दुसऱ्या योजनेंत या उलट प्रवृत्ति आढळून आली. योजनेचा काळ सुरू झाला, तेव्हां किमती चढत होत्या व योजनेच्या संबंध काळांत त्या चढतच राहिल्या, ही चढणूक पंचवीस टक्क्यांनीं झाली. १९५८-५९ सालीं किमतींच्या चढत्या भांजणीनें वेग घेतला. प्रत्येक वस्तूच्याच किमती वाढल्या; परंतु विशेषेंकरून अन्नधान्यांत किमतीचा निर्देशांक तेवीस टक्क्यांनीं वाढला व कच्च्या औद्योगिक मालाच्या किमतीचा निदशांक सदतीस टक्क्यांनीं वाढला. या काळांतील किमतींचा चढउतार शेतकीची व पुरवठ्याची सर्वसामान्य परिस्थिति यांनुसार झालेला आहे. ही प्रवृत्ति निर्माण करणाऱ्या शक्ति प्रत्यक्ष योजनेच्या अंगांतच समाविष्ट करून घेण्यांत आल्या होत्या. योजनेंतील भांडवल-गुंतवणुकीच्या आराखड्यांत मूलभूत धंद्यांवर भर देण्यांत आला होता. औद्योगीकरणास अग्रक्रम होता. योजनेंतील कित्येक कामांचा gestation चा काळ दीर्घ होता. उत्पादन बाजारपेठेंत पोहोंचण्यास अवधि लागणार होता. परंतु तेवढ्यांतच गुंतवणूक वर गेली होती, संपत्तीचा पुरवठा फुगला होता, व मागणी वाढली होती. पुरवठा मागणीबरहुकूम नव्हता. पाऊसपाणी नीट नव्हतें, अशी सबब सांगितली जाते. हा दुःखद प्रकार होय. याचा परिणाम सर्वत्र झाला; परंतु पहिल्या योजनेंत शेतकी-व्यवसायांत बरीचशी भांडवल-गुंतवणी झालेली होती व त्यामुळें पावसापाण्याच्या अभावासारख्या बाह्य परिस्थितींचे धक्के अंशतः तरी रिचविण्याची क्षमता त्या अर्थव्यवस्थेंत यावयास हवी होती. शेतकींत ओतलेल्या गडगंज रकमामुळें शेतकी-व्यवसायाची कायम उन्नति जर होऊं शकत नसेल, तर उन्नतीस अडथळा करणारें तण उपटून काढण्याची वेळ आतां आलेली आहे. किंमतीबाबत दोन योजना परस्परविरोधी चित्रें रंगवितात.

या अनुभवापासून आपण एक धडा शिकूं शकूं, तो हा, कीं देशाचे आर्थिक व्यवहार सांभाळणारी मंडळी जर जागरूक असती, तर या परिस्थितीचा उपयोग देशाच्या फायद्याकरितां करून घेतां येणें



अनुक्रमणिका

शक्य होतें. शेतकी-उत्पादन गरजेपेक्षां पुढें-पुढें जात होतें, त्यामुळें एकंदर अर्थव्यवस्थेंत संपत्ति ओतली जात होती; त्यामुळें घसरणाऱ्या किंमती थोपवितां आल्या असत्या, इतकेंच नव्हे, तर योजनेला एकूण कार्यक्रमालाच अधिक वेग मिळाला असता. योजनाबद्ध विकासाकरतां अधिक लवचिक आर्थिक धोरणाची आवश्यकता आहे.

## इतर देशांतील निर्देशांकांशीं तुलना

गेल्या दोन योजनांच्या काळांत किंमतींची जी हालचाल झाली, ती स्थिरहि नव्हती वा इच्छित दिशेप्रतहि नव्हती. एक सबंध दशक म्हणून विचार करतां किमतींत झालेली वाढ ही अवाजवी नव्हती. इतर कित्येक देशांतील त्याच काळांतील परिस्थितीशीं तुलना करतां यांत अवास्तव कांहींच नाहीं. १९५४ ते ६० या काळांत भारतांतील एकंदर किमतींचा निर्देशांक बारा टक्क्यानीं वर गेला आहे, त्याच काळांत अमेरिकेंत ही वाढ सोळा टक्क्यांनीं झाली आहे, कॅनडांत तेवीस, पश्चिम जर्मनींत पंचवीस, इंग्लंडांत तेहतीस व जपानमध्यें बेचाळीस टक्क्यांनीं झाली आहे. या तुलनेंत दोन मुद्दे ध्यानीं बाळगणें आवश्यक आहे. प्रथमतः, एका दशकाच्या अवधींत किमतींत जरी फक्त बारा टक्यांनींच वाढ झाली असली, तरी वर्षोंवर्षीं जीं आंदोलनें होत राहिलीं, त्यामुळें अर्थव्यवस्थेवर गंभीर परिणाम झाले. १९५१-५५ या काळांत एकंदर किमती सोळा टक्यांनीं खालीं घसरल्या आणि १९५५-६० या काळांत त्या चौतीस टक्यांनीं चढल्या. शिवाय एकंदर किमतींच्या निर्देशांकांत सबंध परिस्थिति गुंडाळली जात नाहीं. त्यानें फक्त ढोबळपणें कांहीं निर्देश केला जातो. निर्देशांकांची तपशीलवार तपासणी केली, तर असें आढळून येतें कीं किमतींचीं आंदोलनें 'अन्न' व 'कच्चा औद्योगिक माल' या सदराखालीं भरमसाट होतीं; कारखानी मालापेक्षां तीं अधिक होतीं. दुसरें म्हणजे, पुढारलेल्या देशांशीं तुलना करणें चुकीचें ठरेल; कारण वेगवेगळ्या अर्थव्यवस्थेंत, मिळकतीच्या पातळ्या वेगवेगळ्या असल्यानें, किंमतीच्या वाढीचे वेगवेगळे परिणाम होतात. उदाहरणार्थ, किमतींत पंधरा टक्के वाढ झाली असें समजूं; तर एवढ्यानें अमेरिकनांना कांहींच कष्ट पडणार नाहींत. परंतु भारतीयांना तें जाणवेल. कारण भारतीयाचें उत्पन्न अमेरिकनाच्या उत्पन्नापेक्षां कितीतरी पटींनीं कमी आहे!

लोकांना प्रेरणा मिळण्याच्या व विकास होण्याच्या दृष्टीनें एका दशकांत किमतींत दहा टक्क्यांनीं वाढ होते, ही गोष्ट उचित अशीच असूं शकेल. किमतीविषयक धोरणाचें लक्ष्य हें असलें पाहिजे, कीं चक्कर आणणारे हेलकावे कमी व्हावेत, 'लंबक एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत लोंबकळत जाऊं नये' -जें वर्षोवर्षीं वा प्रति ऋतूंतच होत आलें आहे. उचित असें किमतीविषयक धोरण आंखणें ही गोष्ट जरी गुंतागुंतीची व प्रचंड अशी समस्या असली, तरी विकासमान अर्थव्यवस्थेंत हें आवश्यक असेंच आहे.

## शेतकी-उद्योगधंद्यांचे परस्पर संबंध

शेतकी व उद्योगधंदे परस्परांपासून स्वरूपाच्या व रचनेच्या दृष्टीनें अगदीं अलग असले, तरी त्यांच्यांत अतिशय घनिष्ट संबंध आहे. ताग, कपाशी व तेलयुक्त बी-बियाणें यांसारखा कच्चा माल शेतकी व्यवसाय उद्योगधंद्यांना पुरवतो; व उद्योगधंदे शेतकऱ्याला पोलादी अवजारें, दैनंदिन गरजेच्या कित्येक जिनसा ( कापडचोपड, जळण यांसारख्या. ) वगैरेंचा पुरवठा करतात. या परस्परसंबंधामुळें अर्थव्यवस्थेंतील सर्वांत महत्त्वाच्या दोन भागांत किमतींच्या बाबतींत परत एक नवीन समस्या उभी रहाते. किमतीविषयक धोरण पूर्णपणें निःपक्षपाती हवें.

वेगवेगळ्या शेतकी-उत्पादनाच्या किमतींत बदल झाल्यानें वेगवेगळ्या पिकांच्या लागवडीखालीं असलेल्या

जमिनीची वांटणी बिघडते. उदाहरणार्थ, कापसासारख्या व्यापारी पिकाची किंमत जर स्थिर ठेवली, तर हवामानाची वगैरे इतर परिस्थिति अनुकूल असल्यास, शेतकऱ्यांस कपाशीची अधिक लागवड करावीशी वाटेल. अशा स्वरूपाची विषमता टाळण्याकरितां किमतींचा वापर करणें किंवा वस्तू–वस्तूमधील किमतीच्या फरकाचें प्रमाण राखण्याकरितां किमती स्थिर ठेवणें, अत्यावश्यक आहे. कारण कांहीं वस्तूंच्या किमतींत खूपच घट झाल्यास उत्पादन व उत्पादनक्षमतेवर त्याचा परिणाम होण्याची शक्यता असते. येथें जातां–जातां हें सांगणें उचित ठरेल, कीं एकूण उत्पादन बाजारांत पाठविल्या गेलेल्या शेतकी उत्पादनांच्या आंकड्यांत मोजतां कामां नये. किमती घसरत असतांना आपल्या रोकड गरजा भागविण्यासाठीं शेतकरी बाजारांत माल पाठवतो व तो बाजारांत पडून राहतो. आणखीहि एक महत्त्वाची गोष्ट ध्यानांत घेणें आवश्यक आहे, ती ही कीं चलनवाढीमुळें फुगलेल्या किमती शेतकी-व्यवसायांत भांडवल निर्माण करण्यास अपायकारक असतात, कारण त्यावेळीं प्रत्यक्ष मिळकतीची प्रवृत्ति खालीं घसरण्याकडे असते. योजनेंत शेतकी–व्यवसायाला एक महत्त्वाची भूमिका देण्यांत आली आहे; असें असतांना तेथें भांडवल–निर्मितींत घट होणें, ही घटना योजनेच्या धोरणाशीं सुसंगत नाहीं. शिवाय, सामान्यतः अनुभव असा आहे, कीं शेतकी–उत्पादनाच्या किमतींत वाढ झाली, कीं आपोआपच कारखानी व औद्योगिक मालाच्या किमतींतहि वाढ होते; परंतु याच्या उलटें मात्र घडतांना दिसून येत नाहीं– म्हणजे शेतकी–उत्पादनाच्या किमती घसरल्या, तर औद्योगिक व्यवसायांत मोलमजुरी व उत्पादन-खर्च हे घटक येतात. परिणामीं, आपला माल घसरत्या बाजारांत विकणाऱ्या व त्या मानानें चढ्या बाजारांत आवश्यक त्या कारखानी वस्तू खरेदी करणाऱ्या शेतकऱ्याच्या पदरीं मोबदला कमी पडतो व अवजारांची चढी किंमत मात्र त्याला सुटत नाहीं. अशा परिस्थितीमुळें लागवडीच्या आधुनिक पद्धतींचा अवलंब करण्यांत, खतें वापरण्यांत, उत्कृष्ट बी-बियाणें वापरण्यांत– सारांश, योजनेंत विकासाकरितां कल्पिलेल्या हरेक गोष्टींत– शेतकऱ्याला रस उरत नाहीं.

### शेतकरी उत्पादक तसाच ग्राहक असतो

शेतकी–उत्पादनाच्या किमती स्वस्त ठेवल्यामुळें बाजारांत वाजवीपेक्षां जास्त माल टिकवून धरण्याच्या कामीं हें लागेल. शेतकी–व्यवसाय सबंध ग्रामीण जनतेला उपजीविका पुरवितो. शिवाय स्वस्त किमतींमुळें, आपल्या गरजा रोकड पैशानें भागविण्यासाठीं शेतकऱ्याला आपला जास्ती–जास्ती माल बाजारांत पाठवावा असें वाटण्याची शक्यता आहे. शेतकऱ्याची भूमिकाच मुलखावेगळी आहे : तो उत्पादकहि आहे व ग्राहकहि पण आहे. स्वस्त किमतींमुळें अर्थव्यवस्थेंतील द्रव्याचा संपर्क न आलेला विभाग नाहींसा होण्यास सहाय्य होईल. ‘स्वतः लागून राहण्याकरितां पिकवा’ हा पारंपरिक उद्देश जाऊन त्याची जागा ‘बाजाराकरितां उत्पादन’ हा उद्देश घेईल, आणि शेतकी–व्यवसायाच्या क्रांतिकरणास त्यामुळें वाव मिळेल. शिवाय, ग्रामीण समाजांत प्रायोगिक परिणामांचा प्रभाव असूं शकेल. त्यामुळें नवें उत्पादन कसें आहे, वगैरे शेतकऱ्यांस कळत जाईल. शेतकी व उद्योगधंदे यांमधील दुवा एकदां पैशांकरवीं पक्का सांधला गेला की त्यामुळें खपाचा एक सांचाच तयार होईल व त्यामुळें कर–धोरणाच्या पंखाखालीं शेतकरी येऊं शकेल.

शेतकीवर उपजीविका करणारे लोक संख्येनें अधिक व द्रव्यानें दरिद्री असल्यानें, त्यांच्याकडे जास्त लक्ष दिलें जाणें आवश्यक आहे. जनतेंतील ऐंशी टक्के हिस्सा अशा लोकांचा आहे व राष्ट्रीय उत्पन्नाचा निम्मा वाटा ते उचलतात. अशा परिस्थितींत, केवळ औद्योगिक व्यवसायांत व शहरांत

असलेली संघटना त्यांच्याजवळ नाहीं, म्हणून, सामान्यतः लक्षांतहि न येतां, त्यांच्या जीवनमानांत घट व्हावी, ही गोष्ट देशाच्या प्राणरसाचा निरोध करणारी आहे. ग्रामीण भारताच्या लोकशाही सरकारनें या प्रश्नाला अग्रक्रम दिला पाहिजे.

कारखानी मालाच्या किमती चढत असल्या कीं ग्राहकांचें जीवनमान थोडक्याच काळांत खालीं घसरतें, धंद्यांतील प्रत्यक्ष रोकड फायदा वाढतो, समाजांतील वेगवेगळ्या गटांच्या मिळकतींतील फरक वाढत जातो. स्पर्धेच्या तत्त्वानुसार बनविलेल्या मालाच्या किमती जोपर्यंत वाढतात, तोपर्यंत पुरवठ्याची अवस्था क्रमाक्रमानें सुधारण्याची शक्यता असते, परंतु मक्तेदारीची पद्धत जर तेथें असेल, तर मग द्रव्याचा ओघ profit pool कडे वळतो.

किमती स्थिर नसतांना औद्योगिक व शेतकी क्षेत्रांत त्याच्या काय प्रतिक्रिया होतात, याचें दिग्दर्शन वरील विश्लेषणांत केलें आहे. किमतीविषयक धोरणाने आपलें लक्ष अर्थव्यवस्थेच्या या दोन्ही विभागांवर केंद्रित केलें पाहिजे. शेतकी व्यवसाय देशाला अन्नाचा पुरवठा करतो व देशांतील एकंदर किंमतमानावर आपला प्रभाव टाकतो तर औद्योगिक व्यवसाय देशाच्या विकासाला वेग देतात.

## किंमती म्हणजे आर्थिक व्यवहाराची तरफ

कोणत्याहि अर्थव्यवस्थेंत किमती एक महत्त्वाची कामगिरी पार पाडत असतात. सबंध आर्थिक व्यवहाराची ती तरफ असते. नियोजित किंवा अनियोजित दोन्ही प्रकारच्या अर्थव्यवस्थांत किमती भांडवलाचा स्थाननिर्देश करतात. अनियोजित अर्थव्यवस्थेंत किमतींची हालचाल कशी होते, हें फारसें महत्त्वाचें नसतें; कारण भांडवल ज्या मार्गानें प्रवाहित व्हावयाचें, ते मार्गच तसे स्पष्ट नसतात. भांडवलाचें प्रवाहित्व अनेक व्यवसायी व्यक्तींनीं खर्च व गोव विक्री यांचा विचार करून घेतलेल्या निर्णयानुसार–म्हणजेच त्यांना मिळणाऱ्या नफ्याच्या प्रमाणानुसार–दिग्दर्शित केलें जातें. नियोजित अर्थव्यवस्थेंत किमतींची हालचाल याहून अधिक महत्त्वाची असते. योजना म्हणजे विशिष्ट कालावधीपुरता आंखलेला परस्परांशीं निगडित असा कार्यक्रम. हा कार्यक्रम हिशेबी असल्यानें, त्यांतील वेगवेगळ्या परिवर्तनशील घटकांत एक विशिष्ट संबंध असतो. किमती आंदोलत राहिल्या, तर इच्छित कार्यक्रम बदलेल. किमती कर्मठपणें दृढ ठेवतां कामां नयेत, परंतु, म्हणून त्यांना वाटेल तसें बहकूंहि देतां कामां नये. सापेक्षतः स्थिर असलेल्या किमती नियोजित कार्यक्रम कार्यवाहींत आणण्यास साहाय्य करतील. भांडवलाचा तुंबा बहुधा आत्मनाशक ठरत असतो; असा तुंबा ह्या सापेक्षी स्थिर किमती शक्यतों टाळतील. उदाहरण द्यावयाचें झाल्यास, 'घरबांधणी' ही कल्पना जर फायदेशीर असेल तर इतर कित्येक आत्यंतिक महत्त्वाच्या कामांकरिता भांडवलाची आवश्यकता असूनहि, भांडवलाचा ओघ घरबांधणीकडेच वळेल. अनावश्यक व कमी महत्त्वाच्या क्षेत्रांत भांडवलाचा ओघ वळण्याची शक्यता आहे. हीं क्षेत्रें योजनेच्या चौकटीबाहेरील असतील, तर योजनेंत अंतर्भाव झालेले महत्त्वाचे घटकहि त्यामुळें दुबळ बनतात. योजनेच्या कार्यांना, मग तीं खाजगी उद्योगविभागांतील असोत कीं सार्वजनिक उद्योगविभागांतील असोत, त्यांना नेहमींच अग्रहक्क दिला गेला पाहिजे किमतींची यांत्रिक करामत जेव्हां आहे -याहून अधिक शिस्तीनें होऊं लागेल, तेव्हां योजनेचें कामकाज सुरळीत होईल. किमतींवरील नियंत्रणानेंच केवळ ही जादू घडून येणार नाहीं, वसुलीचें व एकंदरच आर्थिक धोरण त्या दृष्टीनें आंखलें गेलें पाहिजे.

## निर्यातीचें धोरण

वाढत्या किमती एकंदर योजनेवरील खर्चाचें कोष्टक बदलून टाकतात आपआपला माल स्पर्धित किमतीला देण्याच्या उद्योगधंद्यांच्या व शेतकीच्या क्षमतेवर

त्यांचा प्रभाव पडतो. तिसऱ्या योजनेंत निर्यातीपासून मिळालेल्या रकमेचा कमालबिंदु, आतां आणखी वर चढला आहे. योजनेच्या काळांत ही मिळकत ३,४५० कोटी रुपये व्हावी, अशी अपेक्षा आहे; किंवा सालीना ६९० कोटी रुपये. हें लक्ष्य गांठतां येईल कीं नाहीं, हें स्वदेशांतील व इतर जगांतील बाजारपेठांतील किमतींच्या पातळीवर अवलंबून आहे. जागतिक बाजारपेठेच्या स्पर्धेंत पडावयाचें झाल्यास उत्पादन-खर्चांत परिणामकारकरीत्या कपात घडवून आणली पाहिजे. निर्यात—व्यापारावरील कर-वसुलीचें धोरण थोडें ढिलें ठेवलें, तर आतांची निर्यात आहे तेवढीच राखण्यास तरी मदत केल्यासारखें होईल. योजनेंत निर्यातीच्या उत्पन्नाइतकेच जनतेचे हित-संबंध राखणेंहि अगत्याचें आहे. कच्च्या औद्योगिक मालाचा पुरवठा बऱ्याच प्रमाणांत एकाच किमतीत करतां येणें जर शक्य झालें, पुनर्वसन व आधुनिकीकरण योग्य प्रमाणांत व योग्य वेळीं केलें गेलें, तर उत्पादन-खर्चांत कपात करणें, हें प्रत्यक्षतः शक्य आहे. तिसऱ्या योजनेपुढील महत्त्वाच्या पेंचाचें निराकरण होईल; असें करितां आलेंच नाहीं, तर देश balance of payments च्या अडचणींत सांपडेल, व त्यावेळीं परकीय चलनाच्या गंगाजळीची मऊ गादीहि नसेल व आयातींत खूप कपात करणें व्यवहार्य असणार नाहीं.

शेवटून वाढत्या किमतींमुळें राष्ट्रीय प्रयत्नांचें मूल्य कमी होतें. राष्ट्रीय उत्पादनावर प्रभाव पडतो, तो प्रत्यक्ष भांडवल खेळतें ठेवण्याचा. किमती वाढत असतांना, पैसे खर्च करण्याच्या दृष्टीनें उद्दिष्ट जरी गांठलें गेलें, तरी योजनेंत कल्पिल्याप्रमाणें प्रत्यक्ष भांडवल त्यामुळें खेळतें होत नाहीं.

### वाढत्या कामगारवर्गांतील वाढती अशांतता

उद्योगधंद्यांच्या विकासाबरोबर औद्योगिक कामगारांचा एक नवाच वर्ग उत्पन्न होतो. हा वर्ग 'ट्रेड युनियन्स' बनवून संघटित होतो व त्याला आपल्या शक्तीची व हक्कांची जाणीव असते. दैनंदिन गरजेच्या वस्तूंच्या किमतींत वाढ झाल्यामुळें या वर्गांत अशांतता माजते. उतरत्या ग्राहक-शक्तीचे तडाखे त्यांना बसतात; त्यामुळें आपलें जीवनमान खालावलें आहे, अशी त्यांची खात्री पटते. अधिक मजुरी मिळविण्याकरितां ते चळवळ करतात. ट्रेड युनियनची बळकटी जितकी असेल, तितकी ती या संघर्षांत यशस्वी ठरते व मजुरींतील वाढ मान्य होते, ती ग्राहकाच्या हातीं सोंपविली जाते; किमतींत झालेल्या वाढीचें अशाप्रकारें समर्थन केलें जातें. त्यामुळें एक cumulative प्रक्रिया गति घेते. योजनेच्या दृष्टिकोनांतून पाहिल्यास औद्योगिक क्षेत्रांतील अस्वस्थता व मजुरीचे वाढते दर- दोन्ही बरे नव्हेत. वास्तविक पहातां वाढ व्हावयास हवी 'real wages' मध्यें, पैशाच्या रूपांतील मजुरीमध्यें नव्हे. ही परिस्थिति एका अर्थी वैशिष्ट्यपूर्ण आहे, कारण पैशाच्या रूपांतील मजुरींत एकदां वाढ केली कीं ती कधींच पुसून टाकतां येत नाहीं, मग वाढलेल्या किमती परत पूर्वपदावर आल्या असेनात, कारण मजुरींत घट करूं जातां वाढ करून घ्यावयाच्या वेळेपेक्षां अधिक कडवी चळवळ होणार हें निश्चित.

गंभीरपणें योजना औद्योगिक क्षेत्रांतील शांततेवर भर देते; ही शांतताच नसेल, तर उत्पादनाचा वेग टिकवून धरतां येणार नाहीं. मजुरींत वाढ करण्याचें नाकारलें गेल्यानें कितीतरी औद्योगिक तंटे उद्भवलेले आहेत. कामगारवर्गाचें जीवन सुधारण्याकडे लक्ष न देणाऱ्या अशा गोष्टी जर योग्यप्रकारें हाताळल्या गेल्या, तर औद्योगिक शांतता टिकविण्याच्या कामी त्या आपला वाटा उचलतील.

शिवाय एका धंद्यांत झालेली मजुरींतील वाढ हा कांहीं या प्रक्रियेचा शेवट नसतो, तर ती केवळ सुरुवात असते. रोगाच्या सांथीप्रमाणें ती उद्योगधंद्यांच्या एका गटांतून दुसऱ्या गटांत पसरते. उद्योगधंद्यांच्या वाढत्या सार्वजनिक क्षेत्रांत त्याचा







परिणाम टाळतां येत नाहीं. सरकार, मालक या नात्यानें, विराट् सत्तेनिशीं कामगार चळवळ चिरडून टाकू शकतें. परंतु यामुळें कामगार दुखावले जातील, व एकंदर राष्ट्रीय प्रयत्नांत त्यांची मदत म्हणावी तशी मिळणार नाहीं. म्हणून असे संघर्ष कमीत कमी करणें अत्यावश्यक आहे. कामगारांचें जीवनमान योग्य त्या प्रमाणांत सुधारणें अत्यावश्यक आहे. कामगारांचें जीवनमान योग्य त्या प्रमाणांत सुधारणें उचितच ठरेल.

**चलनवाढीचा संभव व धोके**

किमतींत वाढ होते, तिची प्रवृत्ति चलनवाढ होण्यांत असते; याविरुद्ध बाजूनें करण्यांत येणाऱ्या विधानांचें विवेचन आर्थिक व सामाजिक अशा दोन दृष्टिकोनांतून करितां येतें. प्रथमतः, भविष्यकाळीं ठराविकच उत्पन्न असणाऱ्यांना ही एक शिक्षाच ठोठावल्याप्रमाणें असते. परिणामीं नवेच सामाजिक ताण निर्माण होतात. पेन्शनीचे दर वगैरे वाढवून प्रत्येकचसरकार हे ताण कमी करण्याचा यत्न करतें. अशा परिस्थितीचा फटका ज्यांना जबरदस्त बसतो, त्यांना आश्वासनें देऊन राजकीय पक्ष मतें मिळविण्याची खटपट करतात. ही प्रवृत्ति जगांतील कित्येक लोकशाही देशांत आढळून आली आहे. आपल्या इकडील परिस्थितीला ही गोष्ट कितपत व कशी लागू पडेल, हें आतांच सांगतां येणार नाहीं; नवीन समाज व फटका बसलेले समाजांतील गट सरकारवर किती प्रमाणांत दबाव आणतील, यांवर हें अवलंबून आहे. दुसरें म्हणजे, भरमसाट वाढलेल्या किमती, ज्यांच्याजवळ Liquid भांडवल आहे, त्यांना भरपूर नफा मिळवून देतात. लोक आणि व्यवसाय 'पैशांतून' बाहेर पडून खरी संपत्ति मिळविण्याचा यत्न करतात. अर्थव्यवस्थेंत अंदाज सांगण्याच्या क्रियेचें महत्त्व जबरदस्त वाढतें. ही प्रवृत्ति राष्ट्रीय बचत सर्टिफिकिटें घेऊन बचत करण्याच्या राष्ट्रीय योजनेंत अडथळे निर्माण करते. जंगम मालमत्तेवर लोक साध्या equity shares प्रमाणें उड्या मारतात, कारण त्यांना त्यांत वैभवशाली भवितव्य दिसत असतें. अशा प्रकारें समाजाची बचत भांडवल-गुंतवणुकीकरितां खेळती राहत नाहीं. वर्तमानाकरितां भवितव्याला बळी देण्यामुळें मागणी फुगते व चलनवाढ संभवते.

ठराविक उत्पन्न असलेल्या संस्थांना आपला दर्जा बळजबरीनें कमी केल्यासारखा वाटतो. त्यांना मुद्लच विक्रीस काढावें लागतें. पशाला चिकटून न राहणें, हाच सद्गुण बनतो. लांबवरच्या भविष्यकाळाकरितां बचत करणाऱ्यांचे व नफ्याकरितां कमाल गतीनें पैसा फिरण्यावरच अवलंबून असलेल्यांचे हितसंबंध परस्परविरोधी बनतात. यामुळें ताळतंत्र न बाळगतां समाजाचा एक विभाग जखमी होतो, लोकशाही समाजांतील 'सामाजिक न्याय' व 'समता' या गोष्टी निरर्थक बनतात. अशा स्वरूपाच्या परिस्थितीनें लोकशाही समाजाचा अंत उद्घोषित केला आहे. या आर्थिक विपन्नावस्थेचें भांडवल जे यशस्वीरीत्या करूं शकले, त्यांनीं सूत्रें आपल्या हातीं घेतलीं, संपत्तीचें अवमूल्यन थांबविण्याचें वचन दिलें व नंतर तें निरपवाद मोडलें. शिवाय किमतींतील भरमसाट वाढीमुळें नफ्याची वांटणी वाऱ्यासारखी होते. या वांटणींत कर्तृत्वाचा निकष पाळला जात नाहीं. या नफ्यांवर कर असतात, पण ते कांहीं सर्वच नफ्यावर नसतात, कारण तसें करण्याची हिंमत त्यांच्यांत नसते. Replacement cost हि जबरी ठेवावी लागते, कारण नाहींतर समाजाचें उत्पादक भांडवल कमी होईल व त्याबरोबरच बेकारी ओढवेल, जीवनमान खालीं घसरेल.

चलनवाढ विकासाचा नेहमींचा सांचा मोडून-तोडून टाकते. कोणत्याहि समाजांतील भांडवलाची रचना ही, आहे तें टिकवून धरण्यास व त्यांतून विकास साधण्यास आवश्यक त्या भांडवल–गुंतवणीची निदर्शक असते. विकासाचें पारडें दूरच्या

भविष्यापेक्षा आतांच्या वर्तमानाकडे झुकतें! चलन-वाढीच्या किमती सुदृढ व सतत विकासाला मारक ठरतात. या विधानांना अर्थशास्त्रीय, त्याचप्रमाणें समाजशास्त्रीय, आधार आहे. चलनवाढीनें कळस गांठू नये याची खबरदारी लोकशाही समाजानें घेणें आवश्यक आहे. लोकशाही समाजाजवळ अद्ययावत् आर्थिक ज्ञान हवें, आणि सर्वसामान्यांच्या कल्याणाकरितां धाडसी निर्णय घेण्याची कुवत हवी. लोकशाहीची संपत्ति भयंकर हिंदोळत राहूं नये. सर्व वस्तूंच्या किमतीचें परिमाण ही पैशाची नित्याची भूमिका त्याला देण्याचा प्रयत्न सरकारनें करावा. चलनाच्या व्यभिचारानें, इतर कशाहिपेक्षां, समाजाचीं मुळें अधिक सूक्ष्मपणें, झपाट्यानें व कायमचीं अशीं नीरस केलीं जातात. अशा काळानंतर जो समाज जन्मास येतो, तो पहिल्यापेक्षां वेगळा असतो. महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्याचे व्यवहारहि वेगळ्या पद्धतीनें होतात. म्हणून कोणत्याहि लोकशाही सरकारनें हें धोरण अंगिकारिल्यास त्याचें नियमन उचितप्रकारें करावें, हें धोरण अधिकाधिक दडपत जावें, असें सरकार लौकरच अ-लोकशाहीवादी बनतें. — असें Lord Keynes यांनीं म्हटलें आहे.

## नियमनाचा दुरुपयोग झाला तर

किमतींचें नियमन ही एक अतिशय तोळामासा उपाययोजना आहे. तिचा दुरुपयोग सहजपणें होऊं शकतो आणि दुरुपयोग झाला कीं योजनेचीं सर्व उद्दिष्टेंच निष्फळ होतात. दैनंदिन गरजेच्या वस्तूंच्या किंमती नियंत्रित केल्या तर त्यांचा पुरवठा कमी–कमी होत जाण्याची शक्यता असते. या व्यतिरिक्त इतर वस्तूंच्या किमतींवर नियंत्रण ठेवण्याची तर आवश्यकताच नाहीं; कारण त्यांच्या किमती वाढल्या तर ग्राहक आपणहोऊन काटकसर करून पैसे वांचवील आणि त्यांनीं तसें करणें अगत्याचें आहे. परंतु असहि घडण्याची शक्यता आहे, कीं भांडवलाचा ओघ अनियंत्रित असलेल्या व दैनंदिन गरजेच्या नसलेल्या वस्तूंच्या उत्पादनाकडेच वाहूं लागेल. ज्यांच्या किमती नियंत्रित असतात, तिकडे भांडवलाचा, ओघ वळत नाहीं. शेवटीं अर्थव्यवस्थेंत घोटाळे माजतात. सक्तीच्या योजनाबद्धतेचे दृष्टांत आपल्यासमोर आहेत. दैनंदिन गरजेच्या वस्तूंच्या ग्राहकांकरितां लक्ष्य ठरविलें जातें, तें गांठण्याकरितां भांडवलदार व कामगार यांना टोंचलें जातें कारण दोघेंहि नाखूष असतात. परिणाम असा होतो, कीं 'लक्ष्य' हा शब्द एक टिंगलीचा शब्द बनतो. किंमत नियंत्रणाचें हत्यार अतिशय सावधानपूर्वक वापरलें पाहिजे; त्याबरोबर लोकांना प्रेरणा मिळेल, अशी पूरक उपाययोजना करून ठेवली पाहिजे. लक्ष्य गांठतां न आल्यामुळें योजना बदनाम होते. योजना ही एक गंभीर गोष्ट आहे, तो एक व्यवहार आहे; आपल्याला अमुक अमुक सिद्धी मिळवावयाच्या आहेत, याची लेखी कबुली म्हणजे योजना नव्हे, तर त्या सिद्धी प्रत्यक्षांत मिळविण्याकरितां कर्तृत्व गाजविणें म्हणजे योजना होय. किंमत-नियंत्रणाचे सर्व परिणाम ध्यानीं बाळगून मगच त्याबाबतचें धोरण अंगिकारावयास हवें.

## कर आणि किमती

तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या काळांत किमतींच्या वर्तणुकीवर अनेक गोष्टींचा प्रभाव पडणार आहे. योजनेची रचना व भांडवल–गुंतवणीचा आराखडा; उद्योगधंदे जोसांत उत्पादन करूं लागण्याकरितां जाणारा काळ व उत्पादकांना माल पुरविणारे उद्योगधंदे व ग्राहकांना माल पुरविणारे उद्योगधंदे यांचें परस्परप्रमाण. योजनेस लागणारें भांडवल कशाप्रकारें खर्च केलें जातें, हाहि एक महत्त्वाचा मुद्दा आहे. हें भांडवल आपल्या अंदाजपत्रकांतून किती व तुटीच्या अर्थव्यवस्थेंतून किती प्रमाणांत उभारलें जातें, याचाहि किमतींवर परिणाम होणार आहे. करविषयक धोरणानें येत्या कांहीं वर्षांत जादा करांच्या

रूपानें १,७१० कोटी रुपये मिळवून घ्यावयाचे आहेत. अशा प्रकारच्या कराची सांवली किमतींवर पडणारच. शिवाय करांचें क्षेत्र वाढविण्याकरितां अप्रत्यक्ष करावर या करविषयक धोरणाची मदार आपोआप राहणारच. Eastern Economist नें मांडलेल्या हिशेबानुसार चालू वर्षांच्या अंदाजपत्रकांतील अप्रत्यक्ष करांमळें किमतींची पातळी अडीच टक्क्यांनीं वर जाईल. दुसऱ्या योजनेच्या काळांत अप्रत्यक्ष कर २८० कोटी रुपये रकमेचे झाले होते. या करलादणुकीचा किती बोजा किमतींतील वाढीच्या रूपानें ग्राहकांना उचलावा लागेल, हें दैनंदिन गरजेच्या वस्तंची मागणी किती लवचिक आहे यावर अवलंबून आहे. ही मागणी जर लवचिक असेल तर करविषयक धोरणानें Profit Pool कमी होईल; ती लवचिक नसेल तर किंमतवाढीच्या रूपानें करवाढीचा बोजा ग्राहकांवर पडेल. याप्रमाणें अंदाजपत्रकांतील तुटीचें प्रमाण दुसऱ्या योजनेच्या वेळीं १,१७५ कोटी रुपयांचें होतें, तें तिसऱ्या योजनेंत ५५० कोटी रुपयांवर आणलें असलें तरी करविषयक धोरणाचा परिणाम किमतींवर होणारच.

## किंमतवाढीचीं विविध कारणें

अंदाजपत्रकांतील तुटीचें प्रमाण जबरदस्त कमी केलें तरच फक्त किमतींना अस्थिर करणारा मुद्दा नेस्तनाबूत केल्यासारखें होईल. पैशाचा पुरवठा आपली गति उत्पादनाच्या बरोबरीनें ठेवतो आहे, इकडे लक्ष पुरवलें पाहिजे. विकासमान अर्थव्यवस्थेकरितां अतिशय कडक असें उधारीचें धोरण हितकारक नसण्याचीहि शक्यता आहे – आणि किंमतवाढ हें त्याचें एकमात्र कारण आहे. विकासमान अर्थव्यवस्थेंत किंमतवाढ ही आर्थिक किंवा निरार्थिकवा रचनात्मक दोन्ही प्रकारच्या कारणांमुळें उद्भवूं शकते. निरार्थिक कारणांमुळें झालेल्या किंमतवाढीवर आर्थिक स्वरूपाचीं उपाययोजना करणें, हें विकासाला मारकहि असूं शकेल. स्थैर्य टिकविण्याकरिता पैशाचा पुरवठा पुरेशा प्रमाणांत होत रहावा लागतो. पैशाच्या पुरवठ्यांतील वाढ किमतींतून प्रतिबिंबित होण्यास आपल्या अर्थव्यवस्थेंतील non-monetised असा बराच मोठा विभाग अडचणीचा ठरतो. पैशाची quantity theory मागासलेल्या अर्थव्यवस्थेस फारच मर्यादित प्रमाणांत लागू पडते. चलनवाढीच्या धोक्यावर मर्यादित कर्जधोरणाचा तोडगा तोकडा पडण्याची शक्यता आहे. Fiscal व monetary अशा दोन धोरणांत एक मेळ निर्माण करण्याची फार गरज आहे.

किमतीवर प्रभाव पाडणारा तिसरा घटक म्हणजे योजनेच्या काळांत लोकसंख्येंत होणारी वाढ आणि खपाच्या क्षेत्रावर परिणाम करेल अशी राष्ट्रीय उत्पन्नाची वांटणी.

शेवटून, शेतकी व उद्योगधंद्यांतील उत्पादनलक्ष्यांची सिद्धि. आधींच निर्माण करून ठेवलेली कुवत तत्परतेनें व पूर्णांशानें वापरण्याची खबरदारीहि घेतली पाहिजे. विराट् व मध्यम स्वरुपाच्या पाणीपुरवठा-योजनेमध्यें गेल्या दशकभरांत ७७० कोटी रुपये गुंतविले गेले आहेत. दुसऱ्या फिनान्स कमिशननें असें निदर्शनास आणलें आहे, कीं कांहीं राज्यांत खर्च केलेल्या रकमेच्या व्याजाइतकी रक्कमहि वसूल झालेली नाहीं, उपलब्ध असलेल्या पाणी–पुरवठ्याच्या वापरांत जो वेळ व्यर्थ खर्च होतो, तोहि वाचवितां येण्यासारखा आहे. तिसऱ्या योजनेंत यावर आणखी ६५० कोटी रुपये गुंतवावयाचे आहेत, म्हणजे तिन्ही योजनांत मिळून गुंतवणीची ही रक्कम सुमारें १,४२० कोटी रुपयांच्या घरांत जाते. त्याचप्रमाणें दोन योजनांभरांत विद्युत्‌शक्ति वगैरे योजनांत ६७० कोटी रुपये गुंतविले जावेत, अशी अपेक्षा आहे. या गुंतवणींतहि असाच अनुभव आल्याबद्दल दुसऱ्या Finance Commission नें खेद व्यक्त केला आहे–कांहीं थोडक्याच विद्युत्-योजनांमार्फत पुरेसें








द्रव्य परत आलें आहे. खेरीज तिसऱ्या योजनेंत ९५० कोटी रुपयांची गुंतवणी आखली आहे. शक्तीला असलेली मागणी पुरवण्याचे व ती पुढें वाढावी म्हणूनचे प्रयत्न जर योग्य वेळीं करण्यांत आले, तर या योजनांचा कारभार सुधारेल व त्यातून पुरेसें कांहीं पदरांत पडेल. या शक्यतेवर जर कसून कष्ट घेतले तर अधिक भांडवल हातीं येण्याचाहि संभव आहे. ही कुवत अर्थव्यवस्थेंत आहे; आतां जर कारभारांत आवश्यक ती दक्षता आणली, तर सबंध देश पुढें एक भरारी मारील.

## आमच्या कर्तत्वशक्तीला आव्हान

तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या पोटांत दोन महत्त्वाचे घटक आहेत– योजनेच्या चौकटींतच वाढल्या किमतींकरितां केलेली तरतूद आणि आवश्यक ती गति मिळाल्यास गेल्या दशकांतील प्रयत्नानें विकसित झालेल्या घटकांनीं किंमतवाढ न भासेलसें करणें.

किंमतविषयक धोरणाची उलटसुलट अशी आहे – स्थैर्य निर्माण करण्याचे प्रयत्न करणें ही या क्षणाची निकड आहे. अर्थव्यवस्था या टोकापासून त्या टोकापर्यंत हेलकावे खाणार नाहीं, अशी व्यवस्था करणें. सर्वग्राही व गतिशील किंमतविषयक धोरणानें खालील उद्दिष्टें समोर ठेवलीं पाहिजेत.

१. किमतींच्या सर्वसामान्य पातळीवर भयंकर खळबळ न माजण्याची दक्षता घेणें.

२. शेतकी–मालाच्या किमती कमाल व किमान मर्यादांच्या बाहेर जात नाहीत, याची खबरदारी घेणें. योजनेशी सुसंगतरीत्या स्पर्धा असलेल्या पिकांत योग्य तें प्रमाण ठेवणें, आणि स्थलकालानुसार किमतींत फरक पडूं न देणें.

३. शेतकी व औद्योगिक उत्पादनांच्या किंमतींत योग्य प्रमाण राखणें.

पुढें ठाकलेली कामगिरी प्रचंड आहे. येतीं वर्षें अगणित शक्यतांनीं भरलेलीं आहेत. भारतीय जनतेच्या कर्तत्वशक्तीला हें एक आव्हान आहे. पंचप्रसंगांतून अर्थव्यवस्था सुखरूपपणें स्वयंपूर्ण विकासाप्रत नेणें–याकरितां अफाट हिंमत व आत्मविश्वास हवा. Take–off घेण्याकरितां आवश्यक तें बळ कसें आणावयाचें ? किमती वाढूं न देतां उत्पादन कसें वाढवावयाचें ? वस्तूंचा खप कमी होऊं न देतां बचतीचा वेग कसा वाढवावयाचा ? आणि लगोलगच खपहि कसा वाढवावयाचा ? हें आव्हान स्वीकारण्याकरितां लोकांचें मन वळविण्यास, अर्थव्यवस्था प्रगतीच्या पुढील क्षेत्रांत पदार्पण करील व ध्येयाच्या निकट येईल.

---

" हें युग धर्माच नाहीं. कारण धर्माचा संबंध पुनर्जन्म व परलोक यांच्याशीं आहे; परंतु अध्यात्माचा संबंध पुनर्जन्म वा परलोक यांच्याशीं नाहीं. धर्मांत विवाद आहेत. धर्म हे संप्रदायांत परिणत होतात. धर्माधर्मांत कलह आहे. अध्यात्मांत ह्याला स्थान नाहीं. विज्ञानानें आज जगाला अकस्मात् ल्हान करून टाकलें आहे. विज्ञानानें सगळ्या जगाला खुशाल एक करून टाकावें, परतु धम जगाला विभक्तच राखील अशी जोवर स्थिति आहे तोंपर्यंत विज्ञान यशस्वी होऊं शकत नाहीं. विज्ञानाच्या यशस्वितेसाठीं अशा शक्तींची आवश्यकता आहे कीं जी मनुष्याशीं मनुष्याचा आंतरिक संबंध जोडील, एकमेकांचीं हृदयें सांधील. "

– आचार्य दादा धर्माधिकारी



अनुक्रमणिका

श्री. ग. वा. तगारे

# दासोपंतकृत गीतार्णव ( अध्याय ११ वा )

धाराशिव ( उस्मानाबाद ) येथें दि. १६ ते १८ डिसेंबर १९६१ अखेर भरलेल्या ' पुराणवस्तुप्रदर्शनां'तील प्रमुख वैशिष्ट्य म्हणजे त्यांत मांडलेलीं अप्रसिद्ध ग्रंथांचीं हस्तलिखितें. त्यांत ज्ञानेश्वर, एकनाथ, दासोपंत, तुकाराम इ. संतकवींची अप्रकाशित रचना होती. दासोपंत या एकनाथकालीन पंडित -संत-कवींचा **गीतार्णव** ग्रंथ नांवाने प्रसिद्ध असला तरी त्याचा बराच भाग अमुद्रित म्हणून अप्रकाशित अवस्थेंत अंबेजोगाईस त्यांच्या घराण्यांत पडून आहे. या प्रदर्शनासाठीं त्या ग्रंथापैकीं ११ वा अध्याय माझे सहकारी श्री. सरदेशपांडे यांनीं दासोपंतांचे सध्याचे वंशज श्री. दिगंबरराव गोस्वामी यांचेकडून आणून मांडला होता. त्याची थोडी माहिती देत आहे.

## हस्तलिखित वर्णन

प्रस्तुत पोथीची मूळ प्रत ( Folio ) संख्या ४४ असून ती मलपृष्ठावर कोणीतरी उत्तरकालीन वाचकाने ( अथवा लेखकाने ) ' पत्र स ( सं ) ख्या प्रमाण चवेताळीस ' अशी नमूद केली आहे. पोथीमध्यें कमीतकमी ३-४ लेखकांचीं हस्ताक्षरें असल्यामुळें मूळ पोथींतील ( कुठल्या तरी कारणाने ) कमी झालेलीं पृष्ठें दुसऱ्या लेखकांनीं लिहिलेल्या पोथ्यांतून घेऊन एक प्रत तरी सबंध, अखंड, ठेवण्याचा प्रयत्न केलेला दिसतो.

मूळ प्रतींतील पत्रांचा आकार ३०×१४ सेंटीमीटर असून, उजव्या व डाव्या बाजूस प्रत्येकी ३ सें. मी. समास सोडले आहेत. पृष्ठाचे खाली आणि वर प्रत्येकी २ सें. मी. समास सोडला असून प्रत्येक पृष्ठांत १३ ओळी व प्रत्येक ओळींत ३७-३८ अक्षरें आहेत. अक्षर वळणदार व काळजीपूर्वक लिहिलेलें असून संस्कृत श्लोक, ओवीचा क्रम, व भाष्य लिहितांना तें ज्याचें भाष्य आहे तें श्लोकपद किंवा शब्द तांबड्या शाईंत लिहिले आहेत. यामुळें दासोपंतासमोरील गीता-संहिता, त्यांनीं तिचा केलेला अन्वय, पदच्छेद व अर्थ अगदी स्पष्ट झाले आहेत. माझा कॅमेरा नादुरुस्त असल्यामुळें व ऐनवेळीं फोटोग्राफर न मिळाल्यामुळ पोथींतील भिन्नभिन्न हस्ताक्षरांचीं छायाचित्रें देतां आलीं नाहींत. पोथींतील बरींच पृष्ठें जीर्ण, भोकें पडलेलीं व तुकडे पडण्याचा संभव असलेलीं होतीं. त्यामुळें तिच्या फारसें वाटे न जातां अध्यायाचा उपक्रम व उपसंहार दासोपंतांनीं कसा केला आहे हें त्यांच्याच शब्दांत देतों.

## मंगलाचरण

दासोपंत दत्तोपासक असल्यामुळें त्यांनीं या अध्यायाचे प्रारंभीं श्री अवधूत दत्तांची स्तुति केली आहे. त्यांचा दत्त तीनमुखांचा असल्याचें यांत वर्णन नाहीं. तो परब्रह्माचें प्रतीक असून या ग्रंथकाराला तो गुरुस्थानीं आहे. पण ती स्तुति-तो गुरुगौरव-त्यांच्याच शब्दांत वाचणें बरें :

॥ श्री अवधूताय नमः ॥  
नमो देवा वरदमूर्त्ति ।  
अगम्य न गमे तुझी कीर्त्ति ।  
वेदशास्त्रसिद्धांतीं ।  
योगिराया ॥ १ ॥  
संसार दैन्य हरणा ।  
तापत्रयोपशमना ।








सकळ सुखनिधाना ।
देव देवा ॥ २ ॥

सकळां सारांचें तु सार ।
महासिद्धींचें भांडार ।
देवा तुं माझें माहियेर ।
योगिराजा ॥ ३ ॥

निर्दोष गुणसंपूर्णा ।
नाना गुणांचिया अधिष्ठाना ।
गुण वृत्ति भेद (कृमिभक्षित) * हीना * ।
आत्मरूपा ॥ ४ ॥

तुझया नामाचेनि बडिवारें ।
नातळे संसाराचें वारें ।
आतां विघ्नें तीं अपरें ।
कायें करितील ॥ ५ ॥

हा सद्‌गुरु दत्त त्यांचें सर्वस्व आहे :

तुं गुरु, तुं आत्मा, तुं ज्ञान ।
तुं पिता, तुं माझे प्राण ।
सुख तें तुजसी पासून ।
येरे न पाहिजे ॥ १२ ॥

त्याच्या शिवाय 'येर कांहीं । तें न बैसो माझां हृदयी' अशी त्यांची विनंती असून, 'शब्दें नाकळसी ऐसा जन्ही' अवधूत असला तरी

ज्ञानयोगाचिये भूमिके ।
ज्ञेय वस्तु जें पीके ।
तें प्रकटे नामें येकें ।
अवाच्यही ॥ १४ ॥

## नाममहात्म्य

दत्तनामाच्या बडिवाराने संसाराचें वारें सुद्धा लागत नाहीं तर दुसरीं विघ्नें बिचारीं काय करतील (५) हें मंगलाचरणांत नाममहात्म्य सांगितल्यावर आपल्यासारख्या नित्यमुक्ताला मोक्षाची चिंता नसून नामस्मरणाची आस्था असावी असें त्यांचें मागणें आहे :

म्हणौनि श्री अवधूता ।
नामचि देईं तत्वंता ।
नाहिं मोक्षाची चिंता ।
माझां हृदयी ॥ १५ ॥

असो नामामृत सार ।
तेणें पोषलें अंतर ।
तेणें तदन्वयें समग्र ।
तेंचि जाले ॥ १७ ॥

म्हणौनि मोक्षाची चिंता ।
न लगे मातें नित्यमुक्ता
नामस्मरणीं आस्छा (स्था)
तेंचि असो ॥ १८ ॥

## नाम आणि गीतार्थ

दासोपंतांचे मते नामामृत सेवन केल्यावर जे स्पंदु उठतात ते सर्व गीतार्थांत विखुरले गेल्यामुळे ते व्यक्त स्पंद एकत्रित केल्याने बिनचूक गीतार्थ लागतो. त्यामुळें, त्या गीतार्थाच्या समुदायाने गीतार्णवाची रचना केली आहे. गीतार्णव ग्रंथच नामस्वरूप असल्यामुळें व नाम विघ्नहर्तें असल्यामुळे गीतार्णवरचनेंत विघ्न कसलेंच येणार नाहीं :

ऐसें सेविता नामामृत ।
स्पंद उठविले व्यक्त ।
ते गीतार्थी समस्त ।
जाले विखुरते ॥ १९ ॥

ते मेळविता येके ठाईं ।
गीतार्थु सांपडे भुलि नाहीं ।
मग तयांचां समुदायीं ।
रचिले गीतार्णव ॥ २० ॥

तें गीतार्णव प्रकाशिता ।
विघ्न कैंचे आता ।
नाम मांवर्त्तकु ग्रासिता ।
असे विघ्नांचा ॥ २१ ॥

## विश्वरूपाचें प्रयोजन

भगवद्‌गीतेच्या १० व्या अध्यायानंतर विश्वरूपदर्शन कां दिलें, या दोन अध्यायांची सुसंगत सांगड कशी जोडावयाची, याविषयी दासोपंतांचें म्हणणें असें आहे कीं हें सगळें साकार चराचर जग एकांशाने व्यापलें आहे असें १० व्या अध्यायाचे शेवटी सांगितलें आहे.

'विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत्'
(भ. गी. १०–४२)

माग दशमाध्याओ संपला ।
तेथे विभूतियोगु सूचिळा ।
तयांचा अंतीं बोलिला ।
श्रीकृष्णनाथु ॥ २२ ॥
सकळ जग साकार ।
हें येकांशें व्याप्त चराचर ।
असो गा माझें शरीर ।
म्हणे गोपिनाथु ॥ २३ ॥

आणि याला एक सुंदर, समर्पक दृष्टान्त देतांना ते म्हणतात :

सागरा आसतां पूर्णस्छि (स्थि) ति । तरंगु तो येकांशे व्यक्ति । शरीर म्हणता नाथी । दोषु जैसा ॥ २४ ॥ नाना तरंगांशें साकारू । आपणूचि जाला सागरू । आपणु भरला अपरांपरु । ठाईंचि असता ॥ २५ ॥ तैसा असतांचि निजाकारें । येकें अंशे मी व्यक्तु स्फुरें । तो यया विश्वाचेनि आकारें । मूर्त्ति आला ॥ २६ ॥

यानंतर १० व ११ या अध्यायाचा सांधा जमवून ११ व्याचें प्रयोजन व उपन्यास ते पुढील शब्दांत करतात :

विभूति योगु पुसतां ।
अवृत्ति उपजावी पार्था ।
म्हणौनि विश्वरूप गोपिनाथा ।
सांगणें घडलें ॥ २७ ॥
तें आइकोनि तो पांडुसुतु ।
विश्वरूप देखों अपेक्षितु ।
बोलता जालो परमार्थु ।
तेणे भगवंतेसी ॥ २८ ॥
दिगंबरानुचरू म्हणे ।
तें अर्जुनाचे बोलणें ।
सांगेन प्राकृतें वचनें ।
श्रोतां अवधारिजो ॥ २९ ॥

## उपसंहार

११ व्या अध्यायाचें उपसंहाराचें पृष्ठ (पत्र क्रम ४४) उत्तरकालीन–युरोपीय वाटरमार्कच्या कागदावर–त्यामुळें साहजिकच भिन्न हस्ताक्षरांत आहे. या शेवटच्या पत्रा–(Folio) ची लांबी–रुंदी अनुक्रमें ३०×१४ सें. मी. असून उजव्या व डाव्या बाजूच्या समासांची रुंदी प्रत्येकीं ४·५ सें. मी. आहे. शेवटच्या पानांत अध्याय संपल्यानंतरची जागा मोकळी असल्यामुळे पृष्ठाचे खाली व वर सोडलेल्या समासांचीं मापें दिलीं नाहींत. या पत्रांत दोन्ही बाजूस मिळून ओळींची संख्या २४ (१४+१०) असून प्रत्येक ओळींत ३५–३६ अक्षरें आहेत. या पत्रांत भगवद्गीता १०-५५ वर टीका व पुष्पिका असणाऱ्या १०३६ ते १०५९ ओव्या असून, यापैकीं १०४२ ही ओवी उजव्याबाजूचे समासांत लिहिली आहे. या उपसंहारांत भ. गी. ११-५५ वरील नुसती टीका नसून ११ व्या अध्यायाचा उपसंहार व अध्याय १२ शी सांगड हे दोन्ही प्रयत्न आढळतात.

दासोपंती विवेचनाचा नमुना म्हणून भ. गी. ११-५५ वरील भाष्य जसेंच्या तसें देतो. मूळ श्लोक असा आहे.

मत्कर्मकृन्मत्परमो मद्‌भक्तः संगवर्जितः ।
निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पाण्डव ॥
—११-५५

यावरील विवेचन किती सुलभ आहे तें पाहा :

ऐसे पूससील पांडवा ।
तरि सांगेन भक्तियोगु बरवा ।
माझां स्वरूपीं एक्यभावा ।
पाविजे जेणें ॥ १०३६ ॥

यः ॥ – तरि जो कव्हणि माझा भक्तु ।
शांतु आणि विरक्तु ।
मजवेगळे नाश्रयीतु ।
देवत कव्हणी ॥ १०३७ ॥

मत्कर्मकृन् ॥

विहित आचरोनि आपुलें ।
मदर्पण जेणे केलें ।
आपणा नाहीं ठेविलें ।
भोगावया ॥ १०३८ ॥

कां जे जे इंद्रियांचे धर्म ।
ते ते करी माझेचि कर्मे ।
भजन नवविध उत्तम ।
सर्वदा संपादी ॥ १०३९ ॥

यात्रा प्रदक्षिणा चरणीं ।
करद्वव वोपिले पूजनीं
सेवनी, दानी, भजनी ।
यथाविध ॥ १०४० ॥

वाचा नामस्मरणातें ।
नित्य लागली कीर्तनातें ।
निर्माल्यसेवन त्वचेते ।
माझे मूर्तिचेचि ॥ १०४१ ॥

ध्यान मूर्तीचे निजमनी ।
माझाचि विचारी रहणी ।
मने बुद्धी सकळाकरणी ।
असे बुद्धि ॥ १०४२ ॥

नर्तन लोटांगण चरणीं ।
माझेचि काज जया लागुनी ।
पुढती ते येणे करुनि ।
कैसा होय ॥ १०४३ ॥

मत्परः ॥

मीचि परम तया पुरुषार्थु ।
अर्थु धर्मु मोक्षु स्वार्थु ।
माझीचि प्राप्ति मागतु ।
माझेनि प्रेमे ॥ १०४४ ॥

माझेचि कर्म करितां ।
माझा ठाई पार्था ।
आसक्तु जाला जो सर्वथा ।
नापेक्षी दुजे ॥ १०४५ ॥

माते मागावे कांहीं ।
हा भाऊ जयातें नाहीं ।
तथापि मागावेचि हृदयीं ।
ऐसें उपजे ॥ १०४६ ॥

तरी मातेचि मज मागतु ।
प्राप्तीची इच्छा करितु ।
सर्वापक्षी विरक्तु ।
होऊनिया ॥ १०४७ ॥

मद्भक्तः ॥

ऐसा जो माझा भक्तु ।
प्रेमे जाला आसक्तु ।
मजवेगळे न स्मरतु ।
तेव्हेळी कैसा ॥ १०४८ ॥

संगवर्जितः ॥

विसरला विषयांचें स्फुरण ।
सूटला इंद्रियगुणापासुन ।
मी माझें हे संज्ञान ।
गेलें अस्तमाना ॥ १०४९ ॥

अंतरी सूटला गुणिवृत्ति ।
बाहेरि सूटला प्रीती ।
असो तो न लगे प्रकृति ।
माझेनि अनुसंधाने ॥ १०५० ॥

माझां ध्यानी असे स्वस्छु ( स्थु ) ।
तंव प्रकृति गुणसंगरहितु ।



अनुक्रमणिका







आतां व्यवहारी वर्तेतु ।
तेव्हेळी कैसा ॥ ५१ ॥

**सर्वभूतेषु निर्वैरः ।**

सकळा भूतीं मातें ।
देखिलेचि विचारें आत्मयातें ।
मग वैर-मित्रत्व होते ।
ते सांडिले तेथेंचि ॥ ५२ ॥
समता बुद्धि विश्व पाहे ।
ऐसा निर्वैर जो आहे ।
मित्र तेहीं जया न साहे ।
वैरसूचकु ॥ १०५३ ॥
सर्वत्रा मातें जाणतां ।
सकळ माझेंचि कर्म करितां ।
मीचि पाहिजे सर्वथा ।
जयासिगा ॥ १०५४ ॥
मज वेगळे जे कांहीं ।
त्याचा संगु जया नाहीं ।
ऐसा भक्तु अदेही ।
विकार शून्यु ॥ ५५ ॥

**स मामेति ।**

तो मातें पावे जाण बारे ।
पूर्वोक्त सिद्धिप्रकारे ।
अर्जुना पुडती ते न स्मरे ।
तरी मी सांगैन ॥ १०५६ ॥
शास्त्रद्वारें जाणावयां ।
गुरुरूपें माते देखावया ।
मग तत्त्वविचारू स्मरावया ।
अनुभवज्ञान ॥ ५७ ॥
मग अनुभव ज्ञानें तेणें ।
माझे ठाईं प्रवेशने ।
मीचि होउंनि असणे ।
निरंतर ॥ ५८ ॥
ऐसे होय जिया भक्ती ।
ते हे ऐसीगा वीरपती ।
सकळातें माझी संप्राप्ति ।
येणेचि भजने ॥ १०५९ ॥

हरिः ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे **श्री दिगंबरानुचरकृता श्रीगीतार्णव नाम टीका** तस्यां टीकायां **विश्वरूपदर्शन योगो** नाम एकादशोध्यायः ॥ ११ ॥ संपूर्ण श्रीदिगंबरार्पणमस्तु ॥

हें पृष्ठ ( क्रम ४४ ) व या पोथींतील जुनीं पृष्ठें यांतील शुद्धलेखनाचा विचार करता अनेक अनुस्वार मराठवाड्यांतील भाषेंतून सुमारें ३ शतकांत नाहीसे झाले व त्यामुळें पोथीच्या या पानांत आले नाहींत असें दिसतें. पोथींतील बरीच पानें रासायनिक क्रियेने अधिक टिकाऊ करण्याची तांतडीची आवश्यकता आहे.

दासोपंतांचा 'गीतार्णव' इतका सुप्रतिष्ठित ग्रंथ आहे कीं त्याला प्रसिद्धि द्यावी असें मी प्रशस्तिपत्र देण्याची आवश्यकता नाहीं. मराठवाड्यासाठीं स्वतंत्र विद्यापीठ आहे. त्या विद्यापीठानें स्वतःची ग्रंथमाला काढून त्यांत मराठवाड्यांतील अशा उपेक्षित ग्रंथांचा समावेश करावा. सरकारनेहि इतर प्रकाशकांनीं अनेकदा छापलेले ग्रंथ स्वतः छापत बसण्यापेक्षा त्या खर्चांतून 'गीतार्णवा'सारखा ग्रंथराज मुद्रित करावा अशी सूचना आहे.

दासोपंतांचे सध्याचे वंशज श्री. दिगंबरराव गोस्वामी यांनीं हा अध्याय प्रदर्शनांत मांडण्यासाठीं दिल्याबद्दल मी स्वतः व आमचें इतिहास संशोधन मंडळ आभारी आहोत.

---

श्री. ग. मो. पाटील

# अव्ययीभाव समास

भाषा ज्या शब्दांची बनलेली असते ते शब्द प्रामुख्यानें दोन प्रकारचे असतात. (१) सिद्ध आणि (२) साधित. साधित शब्दांमध्यें पुनः (अ) प्रत्ययघटित (यांत उपसर्ग, कृत् आणि तद्धित यांचा समावेश होतो) आणि (आ) समाससाधित असे दोन विभाग पडतात. प्रत्ययघटित शब्द आणि समाससाधितें यांमध्यें मुख्य फरक असा दाखवितां येईल कीं पहिल्यांमधील प्रत्यय (अगर उपसर्ग) हे स्वतंत्र अर्थकें (free morphemes) नसतात. ते फक्त इतर शब्दांशीं अन्वित होऊनच भाषेंत वावरतात. त्यांना स्वतःचें स्वतंत्र अस्तित्व नसतें आणि त्यांचा स्वतंत्र अर्थ असला तरी त्याचा उपयोग दुसऱ्या शब्दाला अर्थाची निराळी छटा देण्याकडेच करण्यांत येतो; याउलट दुसऱ्यांमधील म्हणजे समाससाधितांमधील घटक हे स्वतंत्र शब्द असतात. त्या घटकांना स्वतःचें स्वतंत्र अस्तित्व असतें आणि कांहीं नियमांनीं विशिष्ट अर्थ दर्शविण्यासाठीं आणि विस्तार वाचविण्यासाठीं त्यांना एकत्र जोडलेलें असतें. पहिल्या प्रकारामधील परतंत्र अर्थकें (bound morphemes) संस्कृतांतील समाससाधितांमध्यें कित्येकदां उपयोगितां येतात आणि त्यांपासून उपसर्गांमुळें प्रादि, अव्ययीभाव वगैरे समास होतात तर प्रत्ययांमुळें उपपद तत्पुरुष, बहुव्रीहि इत्यादि समास बनतात.

मराठींतपण त्याप्रमाणेंच मानण्यास प्रत्यवाय नसावा. पण मराठींत प्रादि समासाला मान्यता नाहीं. कित्येकदां अव्ययपूर्वक समास मानण्याकडे कल झुकतो परंतु तेंहि तितकेंसें इष्ट नाहीं. प्रादि समासांनां पुष्कळदां उपसर्गसाधित शब्द मानण्याकडे मराठी व्याकरणकर्त्यांची प्रवृत्ति दिसते. उदा. अनुरूप, नक्षत्र, निर्गुण, प्रताप, विधवा, सज्जन, सहज, वगैरे. चिंताग्रस्त, जलचर, मानार्ह, कृतघ्न, दैवज्ञ, मांसजीवी, कर्मनिष्ठ वगैरे साधित शब्दांनां प्रत्यक्ष समास म्हणण्याऐवजीं प्रत्ययघटित साधित शब्द म्हणून त्यांची संभावना करण्यांत येते. (पहा : मराठी व्याकरण, रा. भि. जोशी, पृ. २१४, २१५, २२७, २२८ वगैरे) वास्तविक मराठीनें आपलें समासप्रकरण संस्कृतावरूनच उचललें. परंतु मराठी भाषा स्वतंत्र आणि स्वयंपूर्ण बनत गेली, तसतशी तिनें संस्कृत व्याकरणाचीं कांहीं बंधनें दूर केलीं तर स्वतःच्या कांहीं नवीन परंपरा निर्माण केल्या. यांत अनर्थावह कांहींच नाहीं. उलट भाषा प्रगत आणि स्वयंसिद्ध होत असल्याचींच तीं लक्षणें असून त्याबद्दल अभिमान आणि गौरवच वाटावयास हवा. संस्कृतांत अभावानेंच जाणवणारें शब्दयोगी अव्यय हें मराठीचें स्वतःचेंच वैशिष्टय आहे.

खऱ्या अर्थानें पहातां शब्दयोगी अव्यय हा शब्दप्रयोगच चुकीचा आहे. नाम, सर्वनाम, विशेषण, धातु आणि अव्यय हे मराठींतील शब्दांचे पांच प्रकार आहेत. अव्यय हा त्यांपैकीं एक आहे म्हणजे तो एक शब्दप्रकार आहे. आणि शब्द म्हणजे अर्थवाहक स्वतंत्र वर्ण अगर वर्णसमुच्चय! अर्थवाहक वर्ण असून स्वतंत्र नसेल तरीहि तो शब्द नव्हे, (उदा० वि, निर्, दुर् वगैरे) आणि स्वतंत्र वर्ण अर्थविहीन असेल तरीहि तो शब्द नव्हेच नव्हे! पण स्वतंत्र आणि परतंत्र असा शब्दांचा (खरें म्हणजे अर्थकांचा!) भेद मराठींत स्पष्टपणें केला नाहीं; त्यामुळें उपसर्ग आणि प्रत्यय यांच्याप्रमाणेंच सर्वस्वीं परतंत्र असणारीं कांहीं शब्दयोगी अर्थकें, तीं शब्द या उपाधीस पात्र नसतांहि मराठींत अव्ययें म्हणजे शब्दांचा एक प्रकार म्हणून ओळखलीं जातात हें सर्वस्वीं अशास्त्रीय आहे.

आधुनिक भाषाशास्त्रानें शब्दघटनेचा (morphology) विचार करतांना भाषेंतील लघुतम अर्थवाहक घटकांचा (A morpheme is a smallest meaningful unit) अवलंब करून त्या आधारें शब्दविकासाचें विवरण केलें आहे. या लघुतम अर्थवाहकांमध्यें कांहीं स्वतंत्र अर्थकें असतात (free morphemes) उदा., मी, ऊ, घर, जाऊं, पळ, सुंदर, शिवाय, परंतु वगैरे; तर कांहीं परतंत्र अर्थकें

( bound morphemes ) उदा०– स ( द्वि० ए० प्रत्यय ) ; –कडे ( " शब्दयोगी अव्यय " ); – ईल ( भविष्य, तृ. पु. ए. प्रत्यय ); – आई (तद्धित प्रत्यय); सु– ( उपसर्ग ) वगैरे. स्वतंत्र अर्थक स्वतंत्रपणें भाषेंत येऊं शकतात, तर परतंत्र अर्थकांना दुसऱ्या कुणाच्या मदतीशिवाय भाषेंत स्थान नसतें. स्वतंत्र अर्थकें म्हणजे शब्द, व परतंत्र अर्थकें म्हणजे उपसर्ग व प्रत्यय ( विभक्ति, आख्यात , कृत, तद्धित इत्यादि ). ब्लजस-सारख्या व्याकरणकारानें तर व्यञ्जनादि विभक्ति-प्रत्ययांसपण शब्दयोगी अव्ययेंच मानलें आहे, परंतु तसें करतांना " अव्यय " या शब्दप्रकाराच्या व्याख्येकडे अगर त्याच्या वास्तविक स्वरूपाकडे दुर्लक्ष झालेलें दिसतें.

कृष्णशास्त्री गोडबोले, दामले यांसारख्या थोर आणि विचारवंत व्याकरणकारांनींपण शब्दयोगी अव्ययाची व्याख्या व विवेचन करतांना हीच चूक अनवधानानें केलेली दिसते. कांहीं क्रियाविशेषण अव्ययें शब्दयोगी अव्ययेंपण मानलीं गेलीं आहेत. तीं वजा जातां उरलीं शब्दयोगी अव्ययें हीं पुष्कळशीं मूळच्या कांहीं नामांचीं विभक्तिरूपेंच आहेत पण आतां त्यांचा अव्ययें म्हणून उपयोग केला जातो एवढेंच! मग त्यांचा अव्यय म्हणजेच शब्द म्हणून उल्लेख करणें अयोग्य ठरणार नाहीं हा युक्तिवाद फसवा आहे. कारण " पास " याचें " पासून " ( पंचमी ); " मूळ " याचें " मुळें " ( तृतीया ); " संबंध " याचें " संबंधीं " ( सप्तमी ) अशीं रूपें सिद्ध करतां आलीं तरी संस्कृतांतील अकस्मात्, अचिरेण, तस्मात्, दिवा, वगैरे रूपांप्रमाणें तीं स्वतंत्रपणें मराठींत वापरलीं जात नाहींत. तीं इतर शब्दांचा आधार घेऊनच भाषेंत येऊं शकतात हें लक्षांत ठेविलें पाहिजे. शिवाय उपसर्ग आणि प्रत्यय यांना शास्त्रीय परिभाषेंत कोणी शब्द म्हणत नाहींत, मग वरील " शब्दयोगी अव्ययां"नांच काय म्हणून शब्दांच्या प्रकारांत घालावें ?

वास्तविक शब्दयोगी अव्ययें म्हणून ओळखल्या जाणाऱ्या अर्थकांपैकीं वर सांगितल्याप्रमाणें पुष्कळशीं क्रियाविशेषण अव्ययें ( व कांहीं उभयान्वयी अव्ययें ) म्हणून ओळखलीं जातात. त्यांनांच पुन्हां शब्दयोगी अव्ययांच्या यादींत घालण्यानें द्विरुक्तीचा दोष संभवतो. शिवाय त्यांच्या स्वरूपामध्यें अगर अर्थामध्यें कांहीं बदल होतो असें मुळींच नाहीं. बाकी उरलेल्या " शब्दयोगी अव्ययांना " त्या नांवानें ओळखण्यापेक्षां त्यांना अव्ययसाधक तद्धित प्रत्ययच म्हणणें अधिक शास्त्रीय ठरेल; कारण या तद्धित प्रत्ययांमुळें बहुधा अव्ययेंच सिद्ध होतात. उदा० ज्ञानामुळें, कालपर्यंत, उद्यांपासून वगैरे. तेव्हां आजच्या मराठी व्याकरणांतील अव्ययात्मक स्वतंत्र अथक वजा जातां उरलेल्या, " उपर, कडे, करितां, देखील, द्वारां, निशीं, पर्यंत, पासून, पाशीं, पैकीं, बद्दल, मात्र, मुळें, योगें, वाटे, वाचून, विषयीं, सकट, संबंधीं, सह, साठीं, सुद्धां, " वगैरे परतंत्र अर्थकांस अव्ययसाधक तद्धित प्रत्यय, आणि " जोगा, उलटा, निराळा, परता, पुरता, वेगळा, सारखा " वगैरेंस विशेषण-साधक तद्धितप्रत्यय म्हणणेंच योग्य ठरेल. यायोगें शब्दयोगी अव्ययें म्हणून स्वतंत्र मानला गेलेला परंतु खऱ्या अर्थानें अस्तित्वांत नसलेला शब्दप्रकार मराठी व्याकरणांतून गाळतां येऊन मराठी व्याकरणांत शिरलेली एक अशास्त्रीय गणना दूर होईल. शिवाय शब्दयोगी अव्ययांच्या वर्गांत समाविष्ट झाललीं कांहीं स्वतंत्र अर्थकें स्वतंत्रपणें तर वाक्यांत वावरतातच पण पुष्कळदां नाम, सर्वनाम, विशेषण, क्रियापद, फार काय दुसऱ्या अव्ययाशींपण जोडून येतात. उदा. **वर** जा; कोटा**वर**; त्या**वर**; पांचा**वर**; गेल्या**वर**; तेथ**वर**; (तों**वर**) वगैरे. ( ' शिवाय ', ' नंतर ' हेपण याच वर्गांत येतील ). अर्थात् " **वर** " हा शब्द सर्वत्र स्वतःचें अव्ययात्मक स्वरूप तर कायम ठेवतोच, पण अन्वित झालेल्या दुसऱ्या शब्दाची जातिपण पालटून टाकतों. आणि म्हणून केवळ शब्दयोगी अव्यय म्हणून उल्लेख करण्याऐवजीं त्यांचा स्वतंत्र विचार करावयाचें ठरविलें आहे. इतर विभाग सोडून समासप्रकरणांतील अव्ययीभाव समासाचाच विचार प्रस्तुत असल्यामुळें त्याकडे वळूं.

अव्ययीभाव समासांतील प्रथमपद हें बहुधा अव्यय अगर अव्ययात्मक उपसर्ग असून संपूर्ण समास अव्ययात्मक असतो; आणि म्हणून त्याचा पूर्वपदप्रधान समास असा वैशिष्टयपूर्ण उल्लेख केला जातो. उदा. यथाशक्ति, आमरण, बिनतक्रार, दररोज, हरघडी, वगैरे. पण या संस्कृतोद्भव प्रकाराखेरीज अव्ययीभाव समासाचा आणखी एक प्रकार मराठीने स्वतःच्या विभासावस्थेंत आत्मसात्

केला तो रूढ आणि विद्वन्मान्यहि झाला. तो प्रकार म्हणजे गावोगाव, घरोघर, दिवसेंदिवस, क्षणोक्षणीं वगैरे. वास्तविक संस्कृतांतील " प्रति " उपसर्गपूर्वक अव्ययीभाव ( उदा० प्रतिदिन, प्रतिक्षण, वगैरे ) समासाचाच नवा आविष्कार किंबहुना त्याचा विग्रहच ( दिनेदिने, क्षणेक्षणे वगैरे ) आहे हें स्पष्ट आहे. परंतु याचबरोबर मराठीनें रूढ केलेल्या आणखी एका अव्ययीभाव समासाकडे पूर्वसूरींचें लक्ष वेधलें नाहीं याचें आश्चर्य वाटतें. " अगोदर, आंत, आंतून, खालीं, खालतीं, खालून, खेरीज, जवळ, नजीक, नंतर, पलिकडे, पुढें, पुढून, पूर्वी, बाहेर, बाहेरून, भोंवतीं, मध्यें, मधून, मागें, मागून, वर, वरतीं, वरून, विरुद्ध, शिवाय, समोर, समोरून " वगैरे शब्द स्वतंत्र असून त्यांचा स्थलकालवाचक क्रियाविशेषणें ( कांहीं बाबतींत उभयान्वयी अव्ययें ) आणि शब्दयोगी अव्ययें असा दोन्ही ठिकाणीं उल्लेख करून व्याकरणकारांनीं त्यांचें विवेचन केलें आहे.

परंतु मुख्य मुद्दा असा आहे कीं, वर दाखविल्याप्रमाणें शब्दयोगी अव्यय हा शब्दप्रयोगच चुकीचा असून स्वतंत्र अर्थकें असलेलीं वरील अव्ययें जर दुसऱ्या स्वतंत्र शब्दांशीं जोडलीं जात असतील तर दोन स्वतंत्र शब्दांच्या या साधित शब्दास समास म्हणणेंच शास्त्रीय दृष्ट्या योग्य होईल. समास म्हणजे जोडशब्दच ! दोन अगर अधिक स्वतंत्र शब्दांच्या जोडणीनें नेहमीं समासच सिद्ध होतो कीं जो साधित शब्दाचा एक प्रकार आहे; पण जो प्रत्ययघटित साधितमात्र नाहीं. वरील अव्ययांच्या इतर शब्दांशीं होणाऱ्या संयोगीकरणास जर समास म्हणावयाचें नसेल तर समासाची वरील व्याख्या तरी बदलावी लागेल अथवा प्रचलित समासग्राह्य पण रूढ जोडशब्दांस निराळेंच नांव रूढ करावें लागेल. संस्कृतांतील कांहीं अव्ययीभाव आणि प्रादि ( तत्पुरुष व बहुव्रीहि ) समासच, त्यांतील स्वतंत्र शब्द नसलेल्या उपसर्गांच्या उपयोगामुळें वरील जोडशब्दाच्या व्याख्येस अपवाद ठरतील. उदा० अनुगङ्गम्, अधिविष्णु, प्रवातः, प्रपर्णः ( तरुः ) वगैरे. त्यांतील उपसर्ग स्वतंत्र अर्थकें नसलीं तरी त्यांना स्वतंत्र अर्थ तर आहेच; किंबहुना कित्येक स्वतंत्र अर्थकांचीं तीं ऱ्हस्व रूपें अथवा पर्यायशब्द ( Allomorphs ) आहेत हें सूक्ष्म विचारांतीं दिसून येईल. उदा० उत् = उद्गतः, प्र = प्रकृष्टः, प्रपतितः, नि = निर्गतः, वि = विगतः, विशेषः ; वगैरे. निदान संस्कृत व्याकरणाचे उद्गाते व जगांतील भाषाशास्त्राचे आद्यप्रणेते भगवान् पाणिनि यांनीं त्यांना स्वतंत्र अर्थकें म्हणूनच मानलें आहे असें दिसतें. शिवाय समासांच्या नामकरणप्रसंगीं त्यांचें स्वतंत्र वर्गीकरण करून त्या वेळच्या भाषेंतील एका रूढ प्रकारास स्वतःच्या मान्यतेचें शिक्कामोर्तब केलें आहे. अर्थात् वरील जोडशब्दांसपण समासच म्हणणें रास्त आणि शास्त्रीय होईल. या समासांचें नामकरण करावयाचें झाल्यास त्याला **अव्ययीभाव** हेंच नांव योग्य ठरेल. कारण क्रियाविशेषण ( अगर उभयान्वयी ) अव्ययें असलेल्या या शब्दांच्या संयोगीकरणानें झालेला जोडशब्दपण बहुशः क्रियाविशेषणच ठरतो आणि हें लक्षण अव्ययीभाव समासाचेंच आहे. शिवाय या समासांचा विग्रह करणेंपण शक्य आहे. उदा०—घराच्या पुढें = घरापुढें; शेताच्या पलिकडे = शेतापलिकडे, वगैरे.

वरील विधानांवर आक्षेप येणार हें खासच ! पहिला आक्षेप असा घेतला जाईल कीं, अव्ययीभाव समास पूर्वपदप्रधान असून तें पूर्वपद अव्यय अगर उपसर्ग असावें लागतें. परंतु हा झाला संस्कृतचा नियम ! मराठींत तो सर्वस्वीं लागू पडत नाहीं हेंच त्याला उत्तर ! मराठीनें स्वतःच्या विकासाबरोबर एखाद्या नवीन प्रकाराची भर घातली असेल तर शास्त्रीय दृष्ट्या त्याची विचिकित्सा करून त्याचें महत्त्वमापन करणें व शक्यतर त्याला योग्य तें स्थान देऊन त्याचा पुरस्कार करणें हें व्याकरणकाराचें कर्तव्य आहे. मराठीनें रूढ केलेल्या घरोघर, क्षणोक्षणीं, दिवसेंदिवस इत्यादि समासांत पूर्वपदप्रधान अव्ययाचा संस्कृत भाषेचा नियम कुठें लागू पडतो ? आणि तरीहि त्याला आपण अव्ययीभाव समास म्हणतोंच ना ? तेव्हां फार झालें तर असें म्हणतां येईल कीं मराठीनें उत्तरपदप्रधान अशा एका नवीन अव्ययीभाव समासाचा प्रकार रूढ केला आहे, आणि त्याला आतां शास्त्रीय मान्यता देणें क्रमप्राप्त आहे. संस्कृतांत " आजन्म " हा जर अव्ययीभाव समास आहे तर थोड्याफार फरकानें मराठींतपण " जन्मभर " हा अव्ययीभाव समास कां होऊं नये ? प्रत्येक भाषा स्वतःच्या विकासाबरोबर कांहीं नवीन प्रकार निर्माण

करून त्यांना रूढ करते यांत आक्षेपार्ह कांहींच नाहीं. उलट, यांत त्या भाषेचें वैशिष्ट्य, गरजेप्रमाणें नवीन प्रकार शोधून काढून त्यांना मान्यता देणें अगर रूढ परंतु अशास्त्रीय समजल्या जाणाऱ्या प्रकारांनां शिष्टसंमत करणें यांतील कुशलता आणि विकासक्षमता यांचीच प्रतीति होते. "शास्त्राद् रूढीर्बलीयसी" हा न्यायपण विसरून चालत नाहीं.

दुसराहि एक आक्षेप येणें शक्य आहे. अव्ययामुळें निर्माण होणाऱ्या व अव्ययात्मक ठरणाऱ्या या जोडशब्दांना समास म्हणणें तांत्रिकदृष्ट्या अयोग्य आहे. कारण, अशा समासांमध्यें प्रथम शब्दाचें नेहमीप्रमाणें मूळ रूप न राहतां त्याचें सामान्यरूप होतें : उदा. घर + पुढें = घरापुढें, शाळा + समोर = शाळेसमोर; शेत + शिवाय = शेताशिवाय वगैरे. आणि ही गोष्ट समासाच्या तत्त्वाविरुद्ध आहे. समासांतील दोन घटकांपैकीं पहिल्या शब्दाचें मूळ रूप कायम राहतें आणि विभक्त्यादि विकार दुसऱ्या शब्दासच होतात. फक्त पंकेरुह, युधिष्ठिर, विहंगम, दास्याःपुत्रः, कर्तरिप्रयोग वगैरे कांहीं क्षुल्लक समासांतच विभक्तिप्रत्यय कायम राहतो. पण संस्कृत व्याकरणामध्यें याचें स्वतंत्र वर्गीकरण असल्यामुळें अपवादरूपीं अशा समासांनीं मूळ नियमांस बाध येत नाहीं. परंतु वर दाखविलेल्या अव्ययात्मक मराठी जोडशब्दांतील पहिल्या पदाच्या सामान्यरूपाची व्युत्पत्ति आणि चिकित्सा कशी करणार ? आक्षेप अगदींच अनाठायीं नाहीं. पण त्याचें निरसन असें करतां येईल कीं, "शब्दयोगी अव्ययें" गणल्या गेलेल्या अर्थकांपैकीं कांहींच्या योगानें मागील शब्दाचें सामान्यरूप होतें तर कांहींच्यामुळें तसें सामान्यरूप होत नाहीं, तर कांहीं विभक्तिप्रत्ययानंतरपण जोडले जातात. उदा० घरापुढें, घरसुद्धां, घरींदेखील वगैरे. त्यामुळें सामान्यरूप बनविणाऱ्या अव्ययांस फार तर केवल अव्ययें म्हणावें आणि बाकिच्यांस शुद्ध अव्ययें गणावें. शिवाय विभक्तिप्रत्यय नसला तरी सामान्यरूप कायम ठेवून झालेलीं अलुक समासाचीं उदाहरणें मराठींत नाहींतच असें नाहीं. उदा० "पिशाच्चाहातीं कोलीत"; "भिल्ली बोलुनि बोल सुंदर असे रामाकरीं तीं फळें"; "हरिश्चन्द्र ताराराणी । डोंबाघरीं भरी पाणी". (पहा०–मराठी व्याकरण, रा. भि. जोशी. पृ. १९७) कदाचित् हेमचंद्रानें प्राकृत-अपभ्रंशांच्या बाबत केलेल्या षष्ठी लोपाच्या नियमांत अशीं उदाहरणें येऊं शकतील, परंतु तसा त्या बाबतचा खुलासा मराठी व्याकरणांत व्हावयास हवा. घर आणि शेजार या दोन नामांच्या योगानें झालेल्या जोडशब्दाचें रूपपण "घराशेजारीं" असें होतें हेंपण दिसून येईल. तेव्हां सामान्यरूप बनविणाऱ्या अव्ययांमुळें होणाऱ्या समासांना फारतर **अलुक अव्ययीभाव** समास म्हणावें लागेल इतकेंच ! "गेल्याशिवाय, गेल्याखेरीज, गेल्यानंतर" वगैरे उदाहरणांत तर आख्यातप्रत्यययुक्त क्रियापदाचें सामान्यरूप झाल्याचें दिसतें.

असा नवाच एक अव्ययीभाव समास मानल्यामुळें, तज्ञ आणि बुद्धिमान् व्याकरणकारांच्या विवेचनकौशल्याला आव्हान देण्याइतपत क्लिष्ट असलेलें, मराठीचें व्याकरण अधीकच क्लिष्ट होईल असापण आक्षेप येणें अशक्य नाहीं. पण भाषेच्या विकासकालीं प्रचारांत आलेले शब्दप्रयोग केवळ क्लिष्ट वाटतील म्हणून त्यांकडे काणाडोळा करणें अगर मुद्दाम डोळ्यावर कातडें ओढून त्यांचें अशास्त्रीय वर्गीकरण करणें हें शास्त्रीय विवेचनास योग्य नाहीं. सत्य तें रोगनिदान करून त्यावर आवश्यक ती चिकित्सा करणाऱ्या वैद्याची कर्तव्यनिष्ठुर कुशलता व्याकरणकारानें बाणविली पाहिजे. फक्त शब्दयोगी अव्ययें म्हणून वर्गीकरण केलें कीं प्रश्न सुलभतेनें सुटत असतांना मुद्दाम क्लिष्टता निर्माण कां करावी याला उत्तर इतकेंच, शास्त्रदृष्ट्या आपणांकडून अन्याय होऊं नये म्हणून ! दोन अगर अधिक शब्द एकत्र आले कीं समासच झाला पाहिजे हा व्याकरणाचा सिद्धांत खोटा पडूं नये म्हणून ! "पासून, कडे, मुळें, पाशीं" यासारख्या परतंत्र अर्थकांच्या जोडीला "वर, मागें, जवळ" यासारखीं स्वतंत्र अर्थकें एकत्र एकाच वर्गांत घालून घोडे व गाढवें एकत्र बांधण्याचा अप्रयोजक प्रकार आणि शास्त्रबाह्य वतन आपणांकडून घडूं नये म्हणून ! शब्दयोगी अव्यय या नांवाचा शब्दप्रकारच शास्त्रदृष्ट्या विसंगत आहे म्हणून !

संस्कृत भाषेंत अशा उत्तरपदप्रधान अलुक अव्ययीभाव समासास मान्यता नसतांना त्याच भाषेंतून निर्माण झालेल्या मराठी भाषेनें असा अनैतिहासिक आणि परंपराबाह्य समास नव्यानेंच कां मानावा अशीपण

शंका कोणी घेतील. पण व्यवहारक्षम आणि विकासशील भाषेनें मातृस्थानी असलेल्या ग्रांथिक भाषेची सर्वच्या सर्व बंधनें पाळलींच पाहिजेत आणि नवीन पायंडा अगर रूढी निर्माण करूंच नयेत असा सिद्धांत भाषाशास्त्रांततरी किंबहुना संपूर्ण साहित्यशास्त्रांतच कोत्या आणि अप्रगल्भ मनोवृत्तीचा द्योतक ठरेल. संस्कृतांत नसलेले अनेक शब्द, उपसर्ग, प्रत्यय, वाक्प्रचार आणि वाक्यरचना यांना आत्मसात् करूनच मराठी भाषा पुष्ट आणि बलवती झाली आहे आणि दिवसेंदिवस वृद्धिंगत होत आहे आणि म्हणूनच ती अधीक धारदार, तेजस्वी आणि विचारप्रदर्शनास परिपूर्ण ठरत आहे. संस्कृत साहित्यांत नसलेले ओवी, अभंग, सुनीत आणि इतर अनेक छंद मराठींत आहेतच ना ? उलट संस्कृतांतील कांहीं आख्यातप्रयोग, णमुल् , प्रादि समासासारखे प्रकार मराठीनें अंगिकारले नाहींत. तेव्हां हा आक्षेप रास्त नव्हेच नव्हे !

एवंच, शास्त्रीय चिकित्सेनंतर, मराठींत शब्दयोगी अव्यय हा शब्दप्रकार अशास्त्रीय ठरतो, आणि उत्तरपदप्रधान अलुक् अव्ययीभाव समास हें मराठीनें निर्माण केलेलें स्वतःचें एक वैशिष्ट्य आहे, या दोन गोष्टी विद्वानांपुढें सहानुभूतीनें विचार करण्यासाठीं आणि शास्त्रीय चर्चेसाठीं ठेवण्यांत येत आहेत.

---


## नवभारत मासिक

प्रकाशन स्थळ : ३१५ गंगापुरी वाई.

प्रकाशन दिनांक : दरमहा एक तारीख.

मुद्रकः मधुकर शंकर साठे.

जात : हिंदु.

पत्ता : दि प्राज्ञ प्रेस,
३१५ गंगापुरी वाई.

प्रकाशक : वि. म. बेडेकर.

जात : हिंदु.

पत्ता : ३१५ गंगापुरी वाई.

संपादक मंडळ : आचार्य स. ज. भागवत.

जात : हिंदु.

पत्ता : मौनी विद्यापीठ.
गारगोटी— ( कोल्हापूर )

-प्रा. वि. म. बेडेकर.

जात : हिंदु.

पत्ता : ७८३ शिवाजीनगर पुणें. ४.

-प्रा. गोवर्धन पारीख, का. संपादक.

जात : हिंदु.

पत्ता : गणेशभुवन २७६ तेलंग रोड
माटुंगा–मुंबई १९.

मालक : प्राज्ञ पाठशाळा मंडळ
गंगापुरी, वाई

[ रूल नंबर ८, रजिस्ट्रेशन ऑफ् न्यूजपेपर्स सेंट्रल रूल्स १९५६ अन्वयें प्रकाशित ].






अनुक्रमणिका

श्री. नी. र. वऱ्हाडपाण्डे

# बौद्ध दर्शनांतील गति व क्षणभङ्गवाद

भारतीय विचारांच्या इतिहासांत बौद्ध दार्शनिकांनीं फार महत्त्वाची कामगिरी बजावली आहे. तत्त्वज्ञानांत अपेक्षित असणारी विश्लेषणकुशलता व महत्त्वाच्या प्रश्नांचें मर्म पकडण्याची शक्ति त्यांच्या ठायीं फार प्रकर्षानें आढळून येते. कारणता, सातत्य वगैरे गणित, भौतिकी, तर्कशास्त्र इत्यादिकांत गाजलेल्या कल्पनांची त्यांनीं बरीच सखोल चर्चा केली आहे. या चर्चेचा येथें थोडा परामर्श घेण्याचें योजलें आहे.

क्षणभङ्गवादाचा मूलभूत सिद्धान्त असा आहे कीं कोणतीहि वस्तु एका क्षणापेक्षा अधिक कालपर्यंत अस्तित्वांत राहूं शकत नाहीं. म्हणून 'बाण उडतो आहे.' अशा तऱ्हेचीं गतिनिदर्शक वाक्यें अर्थशून्य आहेत.[1] कारण बाण नांवाचा क्षणापेक्षां जास्त टिकणारा कोणताच पदार्थ अस्तित्वांत नसतो. क्षणोक्षणीं एक बाण नष्ट होऊन दुसरा हुबेहूब त्यासारखाच बाण त्याच्या पुढच्या स्थळीं निर्माण होतो. समजा, बाण 'क्ष' या क्षणीं 'अ' पासून निघाला व 'क्षा' या क्षणीं 'आ' वर पोंचला. 'अ' व 'आ' यांच्यामध्यें 'अ १', 'अ २', 'अ ३' वगैरे स्थळें असतात. तसेंच 'क्ष' व 'क्षा' यांच्यामध्यें 'क्ष १', 'क्ष २', 'क्ष ३' वगैरे क्षण असतात. खरोखरी एकच बाण 'अ' पासून 'आ' पर्यंत जात नाहीं. 'अ' वर असलेला बाण 'क्ष' या क्षणीं नष्ट होतो. त्यानंतर 'क्ष १' या क्षणीं 'अ १' वर, 'क्ष २' या क्षणीं 'अ २' वर, हुबेहूब तसाच बाण निर्माण होतो. या क्रमानें शेवटच्या 'क्षा' या क्षणीं 'आ' वर हुबेहूब तसाच बाण शेवटचा बाण निर्माण होतो. एकापुढें दुसरा अशा दर क्षणीं निर्माण होणाऱ्या बाणांच्या या मालिकेलाच बाणाची गति म्हणतात.

## अर्थक्रियाकारित्व

या पक्षाच्या समर्थनार्थ बौद्ध खालील युक्तिवाद करतात –

अमुक वस्तु अस्तित्वांत आहे याचा अर्थ त्या वस्तूमुळें कांहीं परिणाम घडतात असा करावा लागतो. ज्या वस्तूमुळें कांहींच परिणाम घडत नाहींत, ती असली काय आणि नसली काय सारखेंच. जी वस्तु उत्पन्न झाली तरी जगांतल्या इतर कोणत्याहि पदार्थांत कसलाहि फरक होत नाहीं, व नष्ट झाली तरी जगांतले यच्चयावत् पदार्थ जसे होते तसेच राहतात, ती वस्तु उत्पन्न झाली काय कीं नष्ट झाली काय सारखेंच. घट उत्पन्न झाल्यावर एक विवक्षित जागा व्यापतो. त्यांत पाणी साठवतां येतें. त्या जागीं त्याच वेळीं दुसरें कांहींहि राहूं शकत नाहीं. त्या जागेवर भार पडतो. तेथून विशिष्ट वास येतो. यांपैकीं कांहींच झालें नाहीं म्हणजे तेथें ओतलेलें पाणी वाहून गेलें, त्याचवेळीं तेथें दुसरा पदार्थ ठेवता आला, त्या जागेवर कसलाहि भार पडला नाहीं वा तेथून कसलाहि वास आला नाहीं तर तेथें घट अस्तित्वांत आहे या म्हणण्याला कांहींच अर्थ उरणार नाहीं. त्याचप्रमाणें घट तेथून नाहींसा झाल्यावर तेथें ओतलेलें पाणी वाहून जातें, तेथें दुसरा पदार्थ ठेवता येतो, त्या जागेवरचा भार हलका होतो व घटाचा विशिष्ट वास तेथून येईनासा होतो. घट नाहींसा झाल्यामुळें असे अनेक परिणाम होतात म्हणून घट नाहींसा झाला असें म्हणण्यांत अर्थ आहे. पण घट नाहींसा झाला तरी असें कांहींच घडलें नाहीं तर घट नाहींसा झाला असें म्हणणें निरर्थक होईल. तात्पर्य, घट असल्यामुळें अ, ब, क या गोष्टी घडतात व नसल्यामुळें त्या घडत नाहींत असा घट अस्तित्वांत आहे या वाक्याचा अर्थ आहे. अर्थात् अस्तित्व म्हणजे विशिष्ट प्रकारचे परिणाम करण्याचें सामर्थ्य, अर्थक्रियाकारित्व.

१. न गतिर्नाशात् संस्कृतं क्षणिकं यतः। ४








### क्षणे क्षणे यन्नवतामुपैति

अर्थक्रियाकारित्व अशी सत्याची व्याख्या केली तर सत्य क्षणभरापेक्षां जास्त टिकूं शकत नाहीं, असें मानावें लागतें; कारण अर्थक्रियाकारित्व कोणत्याहि दोन क्षणीं सारखें नसतें. कोणताहि पदार्थ दोन निरनिराळ्या क्षणीं एकच कार्य करीत नाहीं. अस्तित्वांत असलेला घट प्रत्येक क्षणीं नवीन कार्य करतो. असें नसतें तर दहाव्या क्षणीं घटाच्या वजनानें न मोडणारें शिंकें अकराव्या क्षणीं मोडलें नसतें. घटाकडे आपण पाहात असतां प्रत्येक क्षणीं घट दिसत असतो. प्रत्येक क्षणीं दिसणें हें घटाचें प्रत्येक क्षणींचें नवीन कार्य आहे. घट पहिल्या क्षणीं दिसणें व दुसऱ्या क्षणीं दिसणें हीं दोन्ही कार्यें एकच आहेत असें म्हणतां येत नाहीं. कारण दुसऱ्या क्षणीं घट नसेल तर तो दिसणार नाहीं. दोन्ही क्षणीं घट दिसणें एकरूपच असतें तर पहिल्या क्षणीं असलेलाच घट दोन्ही क्षणीं दिसला असता. घटाच्या सतत दर्शनाला घटाचें सतत अस्तित्व आवश्यक आहे. घटास्तित्वाचे क्षण घटदर्शनाच्या क्षणाशीं व घटाभावाचे क्षण घटाच्या अदर्शनाच्या क्षणाशीं संबद्ध असतात. अर्थात् घट प्रतिक्षणीं आपलें नवें दर्शन घडविण्याचें नवीन कार्य करतो.

यावर असा आक्षेप येईल कीं चलच्चित्रें पाहतांना एका चित्रामागून दुसरें चित्र दृष्टीसमोर यायला थोडा वेळ लागतो. या मध्यंतरींच्या वेळांत दृष्टीसमोर कांहींच नसतें. तरीहि एका चित्रानंतर कांहीं वेळ कांहींच दिसलें नाहीं व मग दुसरें चित्र दिसलें असें आपल्याला वाटत नाहीं. मध्यंतरीं चित्र नाहीं असा काळ इतका थोडा असतो कीं त्याची जाणीवच होत नाहीं व आपल्याला सतत चित्रदर्शन होत आहे असा अनुभव येतो. यावरून समोर घट नसेल तर घटाचें दर्शन होणार नाहीं म्हणून घटाभावाचें कार्य घटाचें अदर्शन हें असलेंच पाहिजे असें म्हणतां येत नाहीं.

या आक्षेपावर उत्तर असें कीं चलच्चित्रें पाहतांना मध्यन्तरीं चित्र नसतांना चित्र दिसण्याचें कारण पूर्वीच्या चित्राचें दर्शन हें आहे. दृष्टीसमोर असणारें चित्र हें कारण नव्हे. पूर्वदर्शनामुळें होणारें दर्शन व समोर दृश्य असल्यामुळें होणारें दर्शन हीं दोन कार्यें भिन्न आहेत. त्यांची भिन्नता आपल्याला नेहमींच कळत नाहीं. म्हणून तीं भिन्न नाहींतच असें नाहीं.

अर्थात् कोणत्याहि दोन क्षणींचीं कार्यें एकरूप असूंच शकत नाहींत.

गतिमान् पदार्थाचा प्रतिक्षणीं नवीन कारणव्यापार होतो हें स्पष्ट आहे. घट जमिनीवर न राहतां कुणी त्याला डोक्यावर घेऊन जात असेल तर प्रतिक्षणीं त्याचा भार, त्याची सावली, भूमीच्या निरनिराळ्या भागावर व निरनिराळ्या कोणांनीं पडते.

### क्रियांचा क्रम

कोणत्याहि दोन क्षणीं एकच क्रिया असूं शकत नाहीं हें आतांपर्यंन्त आपण पाहिलें. आतां प्रतिक्षणीं निरनिराळ्या क्रिया करणारा पदार्थ एकच असूं शकत नाहीं हें कळायला वेळ लागणार नाहीं. आपण गतीचें उदाहरण घेऊं. समजा 'प' हा अनष्ट पदार्थ गतिमान् आहे व उत्तरोत्तर क्षणीं 'य १', 'य २', 'य ३' इत्यादि स्थलांवर राहणें या त्याच्या क्रिया आहेत. पण असें समजण्यांत एक अडचण आहे. उत्तरोत्तर क्षणीं होणाऱ्या वेगवेगळ्या क्रिया जर एकाच पदार्थाच्या क्रिया आहेत तर त्या वेगवेगळ्या क्षणीं होण्याचें कारण काय ? 'य १' वर राहणारा 'प' व 'य ३' वर राहणारा 'प' यांच्यांत जर कांहींच फरक नाहीं तर 'य २' वर गेल्याखेरीज 'प' ला 'य ३' वर जातां येत नाहीं, 'य' वर मात्र जातां येतें असें कां व्हावें ? 'य १' व 'य २' वर राहणें या दोन्ही क्रियांचें कारण एकच व अभिन्नरूप 'प' हें असेल तर हें कारण उपलब्ध असून देखील दोन्ही क्रिया एकाच वेळीं होण्यास अडचण कोणती ?

ही अडचण म्हणजे 'य १' वर असणाऱ्या 'प', 'य २' वर गेल्याखेरीज 'य ३' वर जाण्यास समर्थ होत नाहीं, ही होय. अर्थात् 'प' च्या जोडीला 'य ३' वर जाण्याचें सामर्थ्य हा एक गुण 'य ३' वर जाण्याच्या क्रियेचें कारण म्हणून मानावा लागतो. 'य २' वर जाण्याचें सामर्थ्य व 'य ३' वर जाण्याचें सामर्थ्य अशीं निरनिराळीं सामर्थ्यें 'प' मध्यें एकच वेळीं वास करूं शकत नाहींत.

आतां 'य १', 'य २' वगैरे ठिकाणीं असणें हीं 'प' चीं निरनिराळीं कार्यें जर निरनिराळीं सामर्थ्यें 'प' च्या ठायीं आल्याशिवाय होऊं शकत नाहींत तर हीं सारीं 'प' चींच कार्यें आहेत असें कां








म्हणावें ? ( 'प'+विशिष्ट सामर्थ्य ) हेंच त्या कार्यांचें खरें कारण आहे.

## स्थायी वस्तु कुठें आहे ?

'प' आणि विशिष्ट सामर्थ्ययुक्त 'प' या वस्तु भिन्न आहेत. तेव्हां वेगवेगळ्या क्षणीं वेगवेगळ्या सामर्थ्यांमुळें झालेल्या क्रिया 'प' नांवाच्या त्या सर्व क्षणांत अनुस्यूत असलेल्या स्थायी वस्तूच्या क्रिया आहेत असें म्हणणें बरोबर नाहीं. 'प' नांवाची स्थायी वस्तु आहेच कुठें ? प्रतिक्षणीं नव्या क्रिया करणाऱ्या कारणांमध्यें कांहींतरी सादृश्य आहे. या सादृश्यालाच स्थायी पदार्थ म्हणायचें असल्यास गोष्ट वेगळी. पण सादृश्य म्हणजे तादात्म्य नव्हे. अर्थात् सदृश पदार्थांत मण्यांना ओवणाऱ्या दोऱ्या-प्रमाणें एखादा स्थायी पदार्थ अनुस्यूत असतो असें म्हणणें बरोबर नाहीं.

कांहीं लोक असें म्हणतील कीं एकच 'प' एका क्षणीं 'य३' वर राहण्यास समर्थ नसतो व दुसऱ्या एखाद्या क्षणीं समर्थ असतो, असें मानण्यांत कांहींच अडचण नाहीं. 'प' चीं सामर्थ्यें प्रतिक्षणीं बदलतात एवढयावरून 'प' नांवाचा कुणी स्थायी पदार्थच नाहीं असें ठरत नाहीं. 'अ' च्या साहचर्यानें 'प' 'क' नांवाचें एखादें कार्य करूं शकेल, व 'ब' च्या सहकार्यानें दुसरें एखादें 'च' या नांवाचें कार्य करूं शकेल. 'अ' व 'ब' हे सहकारी मिळाल्या-शिवाय 'प' अनुक्रमें 'क' व 'च' हीं कार्यें करूं शकणार नाहीं. एवढयावरूनच 'क' हें कार्य करणारा 'प' वेगळा व 'च' हें कार्य करणारा 'प' वेगळा असें ठरत नाहीं.[२] सहकारी भेदामुळें एकाच 'प' चीं कार्यें अनेक होऊं शकतात असें मानणें शक्य आहे.

यावर बौद्ध विचारतात 'प' चे सहकारी 'प' वर कांहीं परिणाम करतात कीं नाहीं ? जर ते कांहींच परिणाम करीत नसतील तर ते निरर्थक आहेत, सहकारी-युक्त 'प' व सहकारीविहीन 'प' यांत कांहीं फरकच नसेल तर सहकारी असले काय आणि नसले काय सारखेच. गतीचें उदाहरण घ्यायचें तर असें म्हणतां येईल कीं 'य१' वर असणारा 'प' व 'य२' वर असणारा 'प' यांत कांहीं फरकच नसेल तर 'य२' वरचा 'प' 'य३' वर जाऊं शकतो, 'य१' वरचा 'प' मात्र 'य३' वर जाऊं शकत नाहीं असें म्हणणें निराधार ठरेल.

'य१', 'य२' इत्यादि सहकाऱ्यांमुळें मुळींच लिप्त न होणारा 'प' शून्यवत् मानला पाहिजे. शून्यावर गरमी वा पाणी यांचा कांहींच परिणाम होत नाहीं शून्य गरमीनें गरम होत नाहीं व पाण्यानें ओलें होत नाहीं. पण चामडें गरमीमुळें स्पर्शास गरम लागतें व पाण्यामुळें ओलें होऊन थंड लागतें. अस्तित्ववान् पदार्थ शून्यासारखे न बदलणारे नसून चामड्यासारखे सहभावी पदार्थामुळें बदलणारे असतात. गरम चामडें व थंड चामडें या वस्तु एकच नाहींत. दोघांतहि चाम-ड्याचे गुणधर्म असले तरी तेवढयावरून त्यांना सारखे मानतां येईल, एकच मानतां येणार नाहीं. कार्य करणारे पदार्थ चामड्यासारखे सहकाऱ्यामुळें बदलत असतील तर निरनिराळ्या सहकाऱ्यामुळें निरनिराळीं कार्यें करणारे पदार्थ निरनिराळे असतात असें मानलें पाहिजे.[३]

## कुर्वद्रूपत्व

वरील युक्तिवाद आन्तरिक सम्बन्धांच्या कल्पनेवर आधारित नाहीं हें येथें लक्षांत ठेवलें पाहिजे. आन्त-रिक सम्बन्धांच्या कल्पनेनुसार पदार्थाचा कशाशीहि सम्बन्ध स्थापित झाला कीं त्या पदार्थांत फरक पडतो. 'अ' च्या उत्तरेस 'ब' आहे या वाक्यांत 'ब' शी सम्बन्धित 'अ' चा निर्देश आहे व 'अ' च्या उत्तरेस 'ब' नाहीं या वाक्यांत याच्या उलट निर्देश आहे. या दोन्ही वाक्यांत निर्दिष्ट केलेला 'अ' सर्वच सम्बन्ध आन्तरिक असतात असें मानलें तर एकच मानतां येत नाहीं. दोन्ही वाक्यांतला 'अ' एकच आहे फक्त त्याचे सम्बन्ध वेगळे आहेत असें म्हणणें या कल्पनेनुसार बरोबर नाहीं.

पण 'य१' वर असणारा 'प' व 'य२' वर असणारा 'प' हीं भिन्न आहेत असें म्हणतांना

---

२. क्रमवत् सहकारिलाभात् स्थायिनोऽतीतानागतयोः क्रमेण क्रमणमुपपद्यते ।

३. वर्षातपाभ्यां किं व्योम्नश्चर्मण्यास्ति तयोः फलम्
वर्षोपमश्चेत्सोऽनित्यः खतुल्यश्चेदसत्फलः ॥








एका 'प' चा 'य १' शीं सम्बन्ध आहे व दुसऱ्याचा 'य २' शीं सम्बन्ध आहे म्हणूनच केवळ ते भिन्न आहेत असा अर्थ अभिप्रेत नाहीं. 'य ३' वर जाण्याचें सामर्थ्य 'य २' वर असणाऱ्या 'प' मध्यें असतें (प + य २) या पूर्ण सम्बन्धघटित पदार्थांत नसतें, 'प' चालतो (प + य २) चालत नाहींत. चालण्याचें सामर्थ्य 'प' मध्यें असतें. (प + य २) मध्यें नसतें.

### यावर आक्षेप असा

निरनिराळ्या स्थलावर राहण्यानें 'प' या गतिमान् पदार्थांत निरनिराळे गुण उत्पन्न होत नाहींत. निरनिराळ्या स्थानावर असलेला 'प' निरनिराळ्या क्रिया करूं शकतो तो 'प' मध्यें फरक पडल्यामुळें नव्हे तर निरनिराळ्या स्थलामध्यें फरक असल्यामुळें. निरनिराळ्या स्थलांच्या सहकार्यानें निरनिराळ्या क्रिया करणें हा 'प' चा स्वभावच आहे. किरण आरशांतून परावर्तित होतात व मातीच्या ढेकळांतून परावर्तित होत नाहींत. किरणाच्या क्रियांतील हा फरक आरसा व ढेकूळ यांच्या फरकामुळें सिद्ध होतो, किरणाच्या फरकामुळें नव्हे. एकच किरण अनेक क्रिया करतो. फक्त क्रियाविषयीभूत वस्तु वेगळ्या असतात. याचप्रमाणें 'प' हा एकच गतिमान् पदार्थ 'य २' वर असतांना 'य ३' वर जाऊं शकतो व 'य १' वर असतांना जाऊं शकत नाहीं याचें कारण 'य १' व 'य २' मधील फरक हें आहे. 'प' चें अनेकत्व हें नाहीं.

### सूत्रावाचून माळ

यावर बौद्ध असें उत्तर देतील :—

एकच किरण अनेक कार्यें करतो असें तुम्ही म्हणता. पण किरण म्हणजे तरी काय ? किरणाच्या म्हणून म्हटल्या गेलेल्या यच्चयावत् क्रियांचा उल्लेख केल्यावर त्याहून वेगळा उल्लेख करायला किरण नांवाचा कांहीं पदार्थ उरेल काय ? जलधारणक्षमता, विशिष्ट आकार, रंग वगैरे घटाचे यच्चयावत् गुण (म्हणजे विशिष्ट अर्थक्रिया) व त्यांचें विशिष्ट संयोजन या व्यतिरिक्त घट नांवाचा कांहीं पदार्थ आहे काय ? असा कोणताहि पदार्थ दिसत नाहीं.

आतां गुणसंघाताव्यतिरिक्त पदार्थ नाहीं असें मानून किरणांचे समस्त परिणाम म्हणजेच किरण, घटाचे समस्त गुण म्हणजेच घट, असें मानलें तर जिथें किरण असेल तेथें किरणाचें भूत व भविष्य सगळेच परिणाम दिसले पाहिजेत. पण असें कधींच घडत नाहीं. किरणाची एखादी क्रिया दिसली तरी हा पहा किरण असें आपण म्हणतों. तेव्हां किरणाच्या सगळ्याच क्रियांशीं किरणाचें तादात्म्य कल्पितां येत नाहीं.

या अडचणींतून सुटका करून घ्यायची असेल तर असेंच मानलें पाहिजे कीं क्षणोक्षणीं घडणाऱ्या नव्या नव्या अर्थक्रिया याच फक्त खऱ्या आहेत. या क्रियांमध्यें कांहीं संगति किंवा सारखेपणा दिसला कीं आपण त्या क्रिया कोणत्या तरी एका वस्तूच्या आहेत असें म्हणतों. पण हा केवळ वाक्प्रचार आहे.

'य २' च्या सहकार्यानें 'प' मध्यें एक नवा गुण उत्पन्न होतो. या गुणाच्या साहाय्यानें 'प' 'य ३' वर जाऊं शकतो असें म्हटल्यानें अनवस्था प्रसङ्गाला आमन्त्रण दिल्यासारखें होतें. कार्य करायला 'य २' हा सहकारी व 'प' हा पदार्थ पुरेसे नाहींत, सहकार्यानें 'प' च्या ठायीं निर्माण केलेला आणखी एक गुण मानावा लागतो तर मग हा गुण तरी कार्य करण्यास पुरेसा आहे कशावरून ? शिवाय हा गुण हेंहि एक कार्यच आहे. हें कार्य निर्माण करायला एखाद्या सहकाऱ्याची आवश्यकता आहे कीं नाहीं ? कारणाच्या ठिकाणीं सहकारी एक विशिष्ट सामर्थ्य किंवा गुण निर्माण करतो, हें सामर्थ्य निर्माण करायला सहकाऱ्याला आणखी एका सहकाऱ्याची आवश्यकता असते अशी सहकाऱ्यांची परंपरा लांबवत गेलें तर या अनंत परंपरेंतून कोणतेंहि कार्य निष्पन्न होऊं शकणार नाहीं.

सारांश, कारण सहकाऱ्याच्या साहाय्यानें कार्य करतें पण त्या कारणांत सहकाऱ्यामुळें कांहींच फरक पडत नाहीं असें मानतां येत नाहीं, किंवा फरक पडतो व या फरकामुळें कार्य होतें, असेंहि मानतां येत नाहीं. या आपत्तींतून सुटायचा एकच मार्ग आहे : 'प' नांवाचें एखादें स्थायी कारण आहे असें न मानणें. 'प' मध्यें फरक पडतो असें म्हणायची सोय नाहीं व फरक पडत नाहीं असें म्हणायचीहि सोय नाहीं. अशा अडचणींत टाकणाऱ्या 'प' ची जरूरच काय ? तथाकथित 'प' मध्यें प्रतिक्षणीं येणारीं नवीं सामर्थ्यें, गुण, वा फरक हेच फक्त

खरे आहेत; स्थायी 'प' असा कांहीं पदार्थ नाहीं असें मानलें म्हणजे झालें. प्रत्यक्ष घडणाऱ्या क्रिया हेंच या गुणांचें वा फरकांचें लक्षण आहे. या क्रिया घडत नसतात तेव्हां ते गुण अस्तित्वांत नसतात. क्रिया करणारा कोणीतरी स्थायी अस्तित्वांत असतो, पण सहकाऱ्यांच्या अभावामुळें तो क्रिया करीत नाहीं अशी द्राविडी प्राणायामाची कल्पना करण्याचें कांहीं कारण नाहीं.

प्रतिक्षणीं नवीन उत्पन्न होणाऱ्या क्रियाशील गुणांना वा सामर्थ्यांनाच बौद्ध कुर्वद्रूपत्व[४] म्हणतात.

### क्षणसन्तानाचें सातत्य

बौद्ध क्षणांना विलग मानतात. म्हणजे त्यांच्या मतें एका क्षणानंतर दुसरा क्षण लगेच येतो. या दोन क्षणामध्यें कोणतेहि क्षण नसतात. मूलाक्षरामध्यें अ या अक्षरानंतर आ हें अक्षर येतें अ व आ यांच्या दरम्यान कोणतेंहि अक्षर नसतें. तसेंच निकटवर्ती क्षणांचें आहे. वसुबन्धु म्हणतो कीं भाव एका क्षणीं उत्पन्न होतो व दुसऱ्या क्षणीं नष्ट होतो. उत्पत्ति व विनाश या दोन क्षणांच्या मध्यें क्षण असले तर या मधल्या क्षणीं पदार्थ अस्तित्वांत असतो कीं नाहीं हें सांगतां येणार नाहीं. जर असला तर पदार्थांचें अस्तित्व क्षणापेक्षां जास्त मानावें लागेल. नसला तर विनाशाच्या क्षणाच्या आधींच त्याचा नाश होतो असें मानावें लागेल.

सर्वसाधारण कल्पनेप्रमाणें कारण कार्याच्या लगेच पूर्वी असतें, म्हणजे कारण व कार्य यांच्या मध्यें कांहींच नसतें. जर कारण व कार्य यांच्यामध्यें नियतरूपानें कांहीं असेल तर तें कार्याच्या अधिक जवळ असल्यामुळें त्यालाच खरें कारण मानावें लागेल. कोणत्याहि दोन क्षणांच्या मध्यें अनंत क्षण असतात असें मानलें तर कारणाची सर्वसाधारण कल्पना लागू होत नाहीं. कार्याच्या पूर्वीचा कोणताहि क्षण घेतला तरी त्याच्या-नंतर व कार्यापूर्वी अनंत क्षण असल्यामुळें अमुक एक भाव कार्याच्या लगेच पूर्वी आहे असें म्हणतां येणार नाहीं.

या न्यायानें बीज हें अंकुराचें कारण आहे असें म्हणतां येणार नाहीं. कारण बीज व अंकुर यांच्या दरम्यान नियतपणें अंकुराच्या पूर्वकालीं असणारे असंख्य भाव असतात. बीजापासून अंकुरापर्यंत असणाऱ्या असंख्य भावांच्या मालिकेंत अनुस्यूत असलेला एखादा स्थायी पदार्थ अंकुराचें कारण आहे असेंहि म्हणणें बरोबर नाहीं. कारण त्या मालिकेव्यतिरिक्त एखादा स्थायी पदार्थ मानतां येत नाहीं.

असंख्य भावांची मालिका कल्पिण्यांत दूषित अन-वस्था ओढवत नाहीं. कारण जितकें सूक्ष्म निरीक्षण करीत जावें तितक्या अवस्था बीज व अंकुराच्या दरम्यान दिसतच जातात. अर्थात् या कल्पनेला प्रत्यक्षाचा आधार आहे.

पण बीज हें अंकुराचें कारण आहे असें मानल्यानें जी अनवस्था ओढवते ती दूषित आहे. कारण बीजा-नंतर लगेच अंकुर येत नाहीं. म्हणून बीजाचें कारणत्व वाचवण्यासाठीं बीजाचे सहकारी व त्यांनीं बीजांत निर्मिलेले असंख्य गुण यांची कल्पना केली जाते. आधी कारणत्वाची कल्पना करायची व मग ती वाचवण्या-साठीं गुणांची कल्पना करायची, याप्रमाणें ओढवलेली अनवस्था केवळ निराधार कल्पनांना वाचवण्यासाठीं आहे ! तिला प्रत्यक्षाचा आधार नाहीं.

### वसुबंधूचा युक्तिवाद

क्षणभंगवादाचें समर्थन करण्यासाठीं वसुबंधु पुढील युक्तिवाद करतो :

नाश हा अभाव आहे. घटाचा नाश होणें म्हणजे घटाचा अभाव स्थापित होणें. अभावाला कारण लागत नाहीं. म्हणून अभावरूप नाश हा स्वाभाविक आहे.[५]

या तत्त्वाचें समर्थन बौद्धांच्या सत्ताकारणव्यापार या समीकरणाच्या आधारें होऊं शकतें. जें आहे त्याचा नाश करणें व जें नाहीं त्याची उत्पत्ति करणें हेंच कोण-त्याहि व्यापाराचें प्रयोजन असतें. गतीच्या उदाहरणा-वरून हें अगदीं स्पष्ट आहे. गतिमान् वस्तु प्रत्येक क्षणीं ज्या स्थानावर असेल त्या स्थानाला सोडून पुढें जात असते. जर ती 'य १' वर असेल तर 'य १' ला सोडून जाण्याच्या अवस्थेंत असते. जें आहे त्याचा नाश करणें हें क्रियेचें स्वरूपच आहे. किंबहुना गति-मान् पदार्थ एका क्षणीं एका स्थानावर राहतो असें

४. अथ भावाद्भिन्नोऽतिशयः सहकारिभिराधीयते इत्यभ्युपगम्यते तर्हि प्राचीनो भावोऽनतिशयात्मा निवृत्तः अन्यश्चातिशयात्मा कुर्वद्रूपादिपदवेदनीयो जायते इति फलितं ममापि मनोरथद्रुमेण[४] ।

५ न कस्यचिदहेतोः स्याद्धेतुरेव विनाशकः । [४]










म्हणण्यापेक्षां त्या स्थानांतून राहतो असें म्हणणें जास्त उचित आहे.

स्चेरवाट्स्कीनें[5] क्षणभंगवाचें सार खालीलप्रमाणें सांगितलें आहे :-

"बौद्धांच्या लेखीं अंतिमसत्य म्हणजे गणिताचा एक बिंदुक्षण– वस्तूची क्रियाशीलता– होय. लहानांतली लहान क्रिया एका क्षणीं, लहानांतल्या लहान स्थलावर म्हणजे बिंदूवर होते. क्षणाचें व बिंदूचें सत्यत्व गणितानें, ज्योतिर्विद्येनें, सिद्ध केलें आहे. ज्या पदार्थाचा वेग सारखा बदलतो त्याचा कोणत्याहि एका क्षणीं व एका बिंदूवर काय वेग आहे हें शून्यलब्धीच्या गणितानें काढतां येतें. ज्योतिःशास्त्रांत ग्रहांची तात्कालिक गति काय आहे हें सांगितलें जातें.

**क्षणभङ्गवादी बौद्धांना शून्यलब्धीचें ज्ञान होतें असें वरीलसारख्या विचारांवरून वाटतें. कांहीं पाश्चात्य गणिती हें कबूल करतात असें स्चेरवाट्स्कीनें नमूद केलें आहे.**

शून्यलब्धीचा शोध न्यूटनच्या शेकडों वर्षें आधी भारतांत लागला कीं काय हा इतिहासाचा प्रश्न आहे. तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें अधिक महत्त्वाचा असलेला मुद्दा असा कीं बौद्धांनीं मानलेले क्षण व शून्यलब्धीला आवश्यक असलेले क्षण यांत फरक आहे. वसुबन्धूनें एका क्षणानंतर लगेच दुसरा क्षण येतो, त्या दोन क्षणांमध्यें कोणताहि क्षण नसतो, असें मानलें आहे. पण शून्यलब्धीच्या अनुसार कोणतेहि दोन क्षण निरन्तर नसतात, त्यांच्यामध्यें इतर असंख्य क्षण असतात. पहिल्या क्षणानंतर दुसरा क्षण असा नसतोच. कारण पहिल्या क्षणानंतरच्या कोणत्याहि क्षणापूर्वी व पहिल्या क्षणानंतर अनेक क्षण असतातच. असें कां मानावें लागतें हें रसेलनें[3] पुढीलप्रमाणें स्पष्टविलें आहे,

## सातत्य व शून्यलब्धि

क्षण व बिन्दु हे एकानंतर दुसरा असे येत असतील तर १, २, ३ ...... अशा संख्यांनीं ते व्यक्तवितां येतील. समजा क्ष व य या दोन संख्या आहेत. संख्या वसुबन्धूच्या क्षणाप्रमाणें निरन्तर मानल्या तर 'क्ष' च्या लगेच नंतर (क्ष + मक्ष) अशी एखादी संख्या राहील. म्हणजे 'क्ष' हून मोठी व (क्ष + मक्ष) हून लहान कोणतीच संख्या असूं शकणार नाहीं.

समजा एखादा पदार्थ य वेळांत क्ष² अंतर जातो. यावरून य = क्ष² असें समीकरण सिद्ध होतें. या समीकरणांत य व क्ष या दोन्ही धन व सत्य (real) संख्या आहेत. जेव्हां क्ष एका संख्येनंतर दुसऱ्या त्याच्या लगेच नंतरच्या संख्येवर येतो तेव्हां य देखील असेंच करील, म्हणजे तोहि लगेच नंतरच्या संख्येवर जाईल. कारण 'य' च्या प्रत्येक मूल्याशीं सम्बद्ध असें क्षचें एक मूल्य असतें व 'क्ष' वाढला कीं 'य' हि वाढतो. क्ष, लगेच नंतरची संख्या सोडून पुढें गेला तर ही सोडलेली संख्या कोणत्याच 'य' बरोबर राहणार नाहीं. परंतु वरील समीकरणांत जी 'य' च्या बरोबर कधींच बसूं शकत नाहीं अशी सत्य संख्या नसतेच. प्रत्येक सत्य संख्या 'य' चें मूल्य ठरूं शकते. म्हणून क्ष, (क्ष + मक्ष) झाला कीं य देखील (य + मय) होईल. क्ष व (क्ष + मक्ष) आणि य व (य + मय) या निकटच्या संख्यांच्या जोड्या असल्यामुळें (क्ष + मक्ष) व क्ष यांतील अंतर (य+मय) व य यांतील अंतराएवढेंच मानावें लागतें. अर्थात् मक्ष = मय व $\frac{\text{मय}}{\text{मक्ष}}$ = १ असें निष्पन्न होतें. उलटपक्षीं जर क्ष चें मूल्य १ घेतलें तर य = क्ष² या समीकरणापासून शून्यलब्धीनें $\frac{\text{मय}}{\text{मक्ष}}$ = २ येतात. अर्थात् $\frac{\text{मय}}{\text{मक्ष}}$ = १ = २ असा वदतोव्याघात येऊन गुदरतो. हा वदतोव्याघात दूर करण्याचा एकच मार्ग आहे. तो म्हणजे क्ष व य च्या लगेच नंतर कोणतीच संख्या नाहीं असें मानणें. असें मानल्यानें 'य' त जेवढा बदल झाला तेवढाच 'क्ष' त झाला पाहिजे; जास्त किंवा कमी होऊं शकत नाहीं या गृहीतांतून निघालेल्या $\frac{\text{मय}}{\text{मक्ष}}$ = १ या समीकरणाची अपरिहार्यता नाहींशी होते.

कोणत्याहि दोन संख्यांच्या मध्यें अनंत संख्या असणें हेंच 'सातत्य' (continuity) होय. सातत्याची कल्पना शून्यलब्धीच्या गणिताला आवश्यक आहे. म्हणून शून्यलब्धीच्या आधारें क्षणभङ्गवादाचें समर्थन करायचें असेल तर वसुबन्धूच्या कल्पनेप्रमाणें क्षणांना निरन्तर मानतां येत नाहीं.

## प्रभाचन्द्राचे आक्षेप

भाव एका क्षणीं उत्पन्न होतो व दुसऱ्या क्षणीं नष्ट होतो या कल्पनेंतील आणखी कांहीं अडचणी प्रभा-

चन्द्रानें नजरेस आणून दिल्या आहेत. तो विचारतो : 'क्षणिक वस्तु कार्य केव्हां करते ? नष्ट व्हायच्या आधी कीं नंतर ? पहिला विकल्प अगदीच अयुक्त आहे. कारण जें अस्तित्वांतच नाहीं तें कार्य काय करणार ? दुसरा विकल्पहि क्षणभङ्गवाद्यांना मानतां येणार नाहीं. अनष्ट वस्तु कार्य करीत असेल तर ती क्षणिक राहूं शकणार नाहीं. कारणाच्या उत्पत्तीचा क्षण व त्यानें केलेल्या कार्याच्या उत्पत्तीचा क्षण या दोन क्षणीं कारणाचें अस्तित्व मानावें लागेल.

प्रभाचन्द्राचा अनुसार करून गतीविषयीं पुढील युक्तिवाद करता येईल. गतिमान् वस्तु 'य १' ला सोडून पुढें जाण्याची क्रिया 'य १' वर असतांना करते कीं नसतांना ? 'य १' वर असणें व 'य १' ला सोडून जाणें या दोन्ही क्रिया क्षणक्षङ्गवादाच्या मतें एकाच क्षणीं होऊं शकत नाहींत. त्या वेगवेगळ्या क्षणीं होतात असेंहि क्षणभङ्गवादी मानूं शकत नाहीं, कारण मग गतिमान् वस्तु 'य १' वर क्षणापेक्षां अधिक काळ राहते असें मानावें लागेल. वस्तु 'य १' वर नसतांना 'य १' ला सोडण्याची क्रिया करते असें दुसऱ्या विकल्पाप्रमाणें म्हणणें तर हास्यास्पदच आहे. वस्तु ज्या जागीं नाहींच त्या जागेस सोडीलच कशी ?

प्रभाचंद्राच्या अडचणींचा परिहार पुढीलप्रमाणें होऊं शकतो.

क्षणभंगवादाप्रमाणें अस्तित्व म्हणजेच क्षणिक कारण-व्यापार. वस्तु व तिची क्रिया यामध्यें क्षणभङ्गवाद भेद मानत नाहीं. प्रभाचंद्राची अडचण वस्तु व तिची क्रिया यांत भेद मानल्यामुळेंच उपस्थित झाली आहे. कार्योत्पत्ति हेंच कारणव्यापाराचें स्वरूप आहे. अर्थात् कारणव्यापार अस्तित्वांत असतांनाच कार्याची उत्पत्ति होते. याचा अर्थ कारणव्यापार क्षणापेक्षां अधिक वेळ चालतो असा नव्हे. ज्या क्षणीं कार्योत्पत्ति होते त्याचक्षणीं कारणव्यापार अस्तित्वांत असतो, त्यापूर्वी वा त्यानंतर नव्हे.

गतीच्या बाबतींत गतिमान वस्तु ज्या क्षणीं 'य १' वर असते त्याच क्षणीं 'य १' ला सोडते असें मानलें पाहिजे. 'य १' हें स्थान सोडणें व 'य १' नंतरच्या स्थानावर जाणें या दोन्ही क्रिया एकच नाहींत. या दोन्ही क्रिया एकच व एकाच क्षणीं होतात असें मानलें तर एक वस्तु एकाच क्षणीं दोन ठिकाणीं राहते असें मानावें लागेल. 'य १' हून 'य २' वर जाणारी वस्तु जोंपर्यंत 'य २' वर पोंचली नाहीं तोपर्यंत केवळ 'य १' ला ती सोडते म्हणून 'य २' वर आहे असें म्हणतां येत नाहीं. अर्थात् 'य १' वर असणें व 'य १' ला सोडणें या दोन क्रिया परस्परविरोधी नाहींत.

## तराजूचीं पारडीं

प्रभाचन्द्राचा दुसरा आक्षेप असा :

बौद्धांनीं मानलेले क्षण अविभाज्य समजतां येत नाहींत, कारण त्या क्षणांमध्यें एकच क्रिया होत नसून अनेक क्रिया होतात. अनेक क्रिया करणारे क्षण एकच कसे मानतां येतील ? ज्योत प्रकाशते तेव्हां एकाच क्षणीं वात जळणें व तेल शोषलें जाणें या दोन्ही क्रिया घडतात. तराजूच्या एका पारड्यांत वजन ठेवलें कीं तें पारडें ज्या क्षणीं खालीं जातें त्याच क्षणीं दुसरें पारडें वर जातें. मग क्षणाचें एकत्व व अविभाज्यत्व कुठें राहिलें ?

प्रभाचन्द्राच्या आक्षेपांत मूलभूत चूक ही आहे कीं त्यानें दिलेल्या उदाहरणांतील अनेक क्रिया त्याला वाटत होतें, त्याप्रमाणें एकाच क्षणीं घडत नाहींत. ज्योति प्रकाशते तेव्हां आधी वातींतलें तेल जळतें, मग वातीचें तैलहीन कोरडें टोंक नवीन तेल त्यांत ओढलें जाईपर्यंत जळतें. तराजूच्या ज्या पारड्यांत वजन ठेवलें गेलें असेल तें पारडें आधीं खाली जातें व त्याच्या ओढण्यानें दुसरें पारडें वर जातें. प्रत्यक्षांत या घटना एकाच क्षणीं घडतात असें वाटतें. कारण त्याच्यामध्यें लोटणारा काळ सूक्ष्म असतो. त्याचें प्रत्यक्ष ज्ञान होऊं शकत नाहीं.

कारणाचा नाश व कार्याची उत्पत्ति एकाच क्षणीं होते हें तत्त्व गतीला लावायचें असेल तर गतिमान् वस्तूची 'य १' वर स्थिति हें कारण, तिने 'य १' सोडणें हा कारणाचा नाश व 'य २' वर येणें ही कार्याची उत्पत्ति अशी व्यवस्था लावावी लागेल. पण 'य १' सोडणें व 'य २' वर येणें या दोन क्रिया एककालीन मानायच्या असतील तर 'य १' व 'य २' च्या मध्यें ती वस्तु राहूंच शकत नाहीं, 'य १' व 'य २' च्या मध्यें स्थानच नाहीं असें मानावें लागेल.

नाहींतर 'य १' ला सोडणारी वस्तु 'य २' वरच असेल असा आग्रह धरतां येणार नाहीं. ती 'य १' च्या पुढें व 'य २' च्या आधीं 'य १·५' वर असूं शकेल.

## सारांश

क्षणभङ्गवादाचें अर्थक्रियाकारित्व = सत्यत्व हें समीकरण समर्थनीय आहे. पण क्षणांची मालिका सलग आहे कीं विलग याबद्दल बौद्धांचीं मतें स्पष्ट नाहींत. उत्पत्ति व नाश एकाच क्षणीं होतात कीं निरनिराळ्या क्षणीं अशासारखे प्रश्न भोंगळ भाषेमुळें उपस्थित होतात. 'क' या क्षणीं 'अ' ची उत्पत्ति होते म्हणजे 'क' क्षणाच्या पूर्वींच्या कोणत्याहि क्षणीं 'अ' नव्हता व 'क' या क्षणीं तो आहे. 'क' या क्षणींच 'अ' चा नाश होतो याचा अर्थ 'क' च्या नंतरच्या कोणत्याहि क्षणीं 'अ' अस्तित्वांत नसतो. अर्थात् 'अ' च्या 'क' क्षणींच्या अस्तित्वालाच पूर्व क्षणांच्या अपेक्षेनें उत्पत्ति व नंतरच्या क्षणांच्या अपेक्षेनें नाश असें म्हणतात.

## उद्धृति


(१) प्रभाचन्द्र प्रमेयकमलमार्तण्ड
(२) मध्व सर्वदर्शनसङ्ग्रह
(३) रसेल, बर्टरॅण्ड Principles of Mathematics
(४) वसुबन्धु अभिधर्मकोश
(५) श्चेरबात्स्की Buddhist Logic.


## विश्वकुटुंबवाद व शास्त्रीय दृष्टि

विश्वकुटुंबाचें ध्येय आजपर्यंत अनेक संतमहात्म्यांनीं लोकांपुढें मांडलें आहे. परंतु तें ध्येय अद्यापि मानवसमाजास प्राप्त करून घेतां आलेलें नाहीं. आजपर्यंत ज्या संत महात्म्यांनीं या ध्येयाचा पुरस्कार केला, त्यांनीं समाजाच्या भौतिक अभ्युदयाला कारणीभूत होणाऱ्या अर्थशास्त्र-नीतिशास्त्रादि सामाजिक शास्त्रांकडे व धनोत्पादनाच्या पद्धतींतील सुधारणांकडे किंवा भौतिक विद्येकडे द्यावें तितकें लक्ष दिलेलें नाहीं; तसेंच सामाजिक संस्थांच्या विकासाचे नियम शोधून काढून कोणत्या परिस्थितींत कोणत्या साधनांनीं आपणांस विश्वकुटुंबाची प्रस्थापना करतां येईल, या विषयांकडेहि त्यांचें फारसें लक्ष नव्हतें. व्यक्तिमात्राची आर्थिक स्थिति सुधारण्याकडे विशेष लक्ष न देतां केवळ नैतिक उन्नतीवरच आजपर्यंतच्या साधुसंतांनीं भर दिलेला आहे; उलट सध्यांचे विश्वकुटुंबवादी लोक हें समाजशास्त्रांचें ज्ञान आणि भौतिक शास्त्रांच्या साहाय्यानें सामाजिक उन्नति करून घेण्याची त्यांची वृत्ति या दोहोंत प्राचीन साधुसंतांहून सरस आहेत किंवा पुढें गेलेले आहेत, हा आक्षेप सर्वस्वी खरा नसला तरी त्यांत बरेंच तथ्य आहे हें मी जाणतों. परंतु अध्यात्मवाद आणि शास्त्रीय दृष्टि किंवा सामाजिक विकासाचें तत्त्व, हीं परस्परांशीं विसंगत आहेत, ही समजूत अगदीं निराधार आहे.

– आचार्य जावडेकर

---














श्री. दि. ना. घारे

# गुरुदेव टागोरांची चित्रकला

पाश्चात्य देशांतील रसिकांनी रवीन्द्रनाथांच्या अद्वितीय प्रतिभाशक्तीचा गौरव 'नोबेल पारितोषिक' देऊन केला तेव्हां कुठें भारतीयांनीं त्यांच्या काव्याचें महत्त्व जाणलें. भारतामध्ये व्यक्तींना मोठेपणा फार उशिरा मिळतो. किंबहुना आमचेच गुण आम्हाला दिसत नाहीत याचा प्रत्यय भारतांत प्रत्यहीं येतो. रवीन्द्रनाथांच्या चित्रकलेच्याहि बाबतींत असा अनुभव आला असल्यास नवल नाही.

१९३० सालीं ज्यावेळेस भारतामध्ये अशी वार्ता आली कीं रवीन्द्रनाथ टागोर आपल्या चित्रांचें प्रदर्शन पॅरिसला भरवीत आहेत, मोठे मोठे कलाकार, टीकाकार, कलाप्रेमी त्यांच्या कलेचें कौतुक अत्यंत प्रेमादराने करीत आहेत, इतकेंच नव्हे तर कलेचा संग्रह करणारे त्यांचीं चित्रें मोठमोठ्या रकमा देऊन विकत घेत आहेत, तेव्हां भारतांतील सामान्य जनताच नव्हे तर कलाकारहि आश्चर्यानें तोडांत बोटें घालूं लागले !

रवीन्द्रनाथांनी पुनः आपल्या चित्रांचें प्रदर्शन भारतांत प्रथम १९३३ साली भरविलें. अनेक लोकांनी तें पाहिलें. पुष्कळांच्या नजरेंत चिंतेची भेसूर दाट छाया दिसूं लागली. अनेक कलाकारांनी आपल्याला या चित्रांतील कांहीहि समजलें नाही असा स्पष्ट कबुलीजबाब दिला ! ह्या वेळेस त्यांच्या चित्रांचा यथायोग्य सत्कार व आदर मुंबईत झाला नाहीं तरीपण कलेच्या आत्माविष्कारासंबंधीची नावीन्यपूर्ण वैचारिक भूमि तयार झाली हें निश्चित.

### उपजत कलेचा आविष्कार

आश्चर्याची गोष्ट म्हणजे ज्या रवींद्रनाथांच्या चित्रांचा एवढा गौरव केला जात होता त्यांनीं कोणत्याहि आर्ट स्कूलमध्यें पेंटिंगचे धडे घेतले नव्हते. रवीन्द्रनाथांनी आपल्या आठवणीमध्ये असें म्हटलें आहे कीं आधुनिक चित्रकलेचा भारतीय पुरस्कर्ता माझा पुतण्या अवनींद्रनाथ ह्याच्यासारखीं चित्रें आपल्याला काढतां येत नाहीत म्हणून मला फार हळहळ वाटत असे.

काव्य आणि संगीत यावर त्यांचें असामान्य प्रभुत्व होतें पण रंग आणि रेषा ह्या माध्यमाद्वारें देखील त्यांनीं नांव मिळविलें.

एखाद्या हौशी चित्रकाराप्रमाणे त्यांनीं इ. स. १८९० मध्ये म्हणजे वयाच्या २९ व्या वर्षीं कांही चित्रें रेखाटलीं असतील तेवढींच. १९०९ मध्यें मुकुल डे यांना त्यानीं तीं गुपचूप दाखविलीं होतीं, पण तीं सारीं रेखाचित्रें होतीं, कलाकृती नव्हती. टागोरांचीं बहुतेक चित्रें अपूर्ण आहेत. याचें मुख्य कारण असें कीं एखाद्या वस्तूचें यथातथ्य चित्रण करावें ह्या उद्देशाने त्यांची निर्मिती झालेली नाहीं. समोर एखादें मॉडेल ठेवून त्याबरहुकुम तंतोतंत आकृति चितारण्याचाहि त्यांनी कधीं यत्न केला नाहीं. त्यांचीं चित्रें हीं-त्यांच्याच शब्दांत सांगावयाचें म्हणजे-" अमूर्त आत्म्याचें मुक्त व स्वच्छंदी नर्तन आहे." ज्याप्रमाणे एखादें बालक अंतर्गत स्फूर्तीनें चित्र काढतें त्याप्रमाणेंच तंत्रबद्धतेचा बडेजाव न माजवतां, किंबहुना तांत्रिक बंधनें झुगारून देऊन, केवळ संज्ञाप्रवाह जसा वाहील त्याप्रमाणें रेषा व रंग यांचा उपयोग करून त्यांचीं चित्रें निर्माण झालीं आहेत.

### कलेतील अनिर्बंधता

कलेला कोणत्याहि नियमांच्या कचाट्यांत जखडून ठेवतां येणार नाहीं. कला स्वतःच स्वतःचें

माध्यम स्वीकारीत असते. तिचें मूल्यमापन करतांना जुन्या तंत्राचीं वजनेंमापें कुचकामीं ठरतात म्हणूनच रवीन्द्रनाथांच्या चित्रकलेसंबंधी श्रद्धानिष्ठ असा भेदभाव करून मूल्यमापन करणें अस्थानीं होईल. त्यांच्या चित्रांचें मूल्यमापन करतांना अंतर्गत सौंदर्य, कलागुण, आणि त्यांतील अभिव्यक्तीचा जोरकसपणा हा अनुभवावयाचा असतो, त्यांची व्याख्या करतां येत नाही

कोणत्याहि परंपरागत शैलीपासून अलिप्त राहून केवळ आपल्या बुद्धीला पटेल त्याप्रमाणे रेषा आणि रंग यांना अनियंत्रितपणें वाहू देण्यांतच खरें आत्मक सौंदर्य प्रकट होत असतें. बालकाच्या चित्ररेखाटनाप्रमाणे जरी ही प्रक्रिया असली तरी ती अगदींच निर्हेतुक नाहीं. सुप्रसिद्ध कलाटीकाकार व पाश्चात्यांना भारतीय चित्रकलेची ओळख करून देण्यास ज्यांनी जीवापाड श्रम घेतले त्या डॉ. आनंदकुमारस्वामी यांनी रवीन्द्रनाथांविषयी असे उद्गार काढले आहेत : " They ( Paintings ) are Childlike, but not Childish "

त्यांच्या कल्पनेने रेखाटलेल्या आकृत्या ओबडधोबड व अत्यंत हिडीस दिसत असल्या तरीपण त्या पराकाष्ठेच्या साध्या, कौशल्यरहित, सामंजस्य ( harmony ) व तालबद्धता ( Rhythm ) कायम ठेवणाऱ्या आहेत. परंपरागत सौंदर्याच्या दृष्टीनें त्या कितीहि निकृष्ट ठरल्या तरीपण एक गोष्ट सत्य आहे कीं त्यांतील प्रत्येक रेषा आणि रंग जिवंत जोरकस व परिणामकारक आहेत. प्रत्येक रेषेंत आत्मिक सौंदर्य, हालचाल, तालबद्धता आहे. काव्यांत आढळणारें माधुर्य त्यांच्या रेषेद्वारा प्रकट झालें आहे. अर्थात् बाह्यसौंदर्य व माधुर्य ह्यांचा आस्वाद निरपेक्ष दृष्टीने घेणें आवश्यक आहे. कारण मूलतः बाह्यसौंदर्य व पंचज्ञानेंद्रियद्वारा मिळणारें माधुर्य हें सापेक्ष, व अनिश्चित आहे. खरें माधुर्य अंतर्गत सुसंगति राखण्यांत आहे व यामध्ये रविंद्रनाथांना कमालीचें यश प्राप्त झालें आहे.

स्वतःच्या चित्र लेविषयीं बोलतांना रवीन्द्रनाथ म्हणतात, " माझीं चित्रें म्हणजे माझ्या काव्याने रंग आणि रेषा ह्यांचें धारण केलेलें दुसरें रूपच. जर त्यांत कांहीं वैशिष्ट्य कोणाला आढळलेंच तर तें आकारामध्यें सुसंगति राखण्यांतच आहे. कारण कीं अंतिम वास्तवता तीच आहे. माझीं चित्रें कोणतीहि ठळक घटना वा रूढ कल्पना दाखविण्यासाठीं अवतरलीं नाहींत. " त्यांच्या कोणत्याहि चित्रांत — मग तें पूर्ण असो वा अपूर्ण असो " आकारांत होणारी सुसंगति " ( Rhythmic significance of form ) इतक्या सहजतेनें आपल्या डोळ्यात भरते कीं त्याची असामान्यता, अप्रतिमता कोणालाहि नाकारता येणें शक्यच नाहीं.

## एकाच बैठकींतील चित्रें

त्यांनी काढलेलीं बहुतेक चित्रें एकाच बैठकींत संपवलेलीं आहेत बहुधा एखाद्या तासांतच, एकदा पेन वा ब्रश उचलला म्हणजे त्यांची प्रतिभा अज्ञात प्रदेशावर नानाविध रूपानें नटू लागते आणि चित्रांत जोंपर्यंत सामंजस्य राखलें जात नाही तोपर्यंत त्यांची प्रतिभा ते मिळविण्यासाठीं जिवाचें रान करूं लागते. ती प्रक्षुब्ध होते. एकदां सामंजस्य प्राप्त झालें म्हणजे त्याचा आत्मा शांत होतो. त्यांच्यापाशी नैसर्गिक तःच सुप्त असलेली सृजनशक्ति सहजस्फूर्त रीतीने रेषेंतील मार्दव, चैतन्य घेऊनच जन्माला येते त्यांचीं चित्रें ही रूढ अर्थाने " कलाकृति " नसून प्रतिभेच्या अद्‌भूत अमूर्त शक्तीचा दृश्य पुरावा आहे. म्हणूनच ती आत्म्यांची क्षुधा, आकांक्षा, इच्छा व्यक्त करते. जीवात्मा कोणत्या प्रक्रियेने ( Process ) व्यक्त होतो याचा चित्रपट त्यांच्या चित्रांत आढळून येईल. सुप्त मनाला नेणीवेच्या क्षेत्रांतून जागृत करून अनुभवाच्या पातळीवर आणण्यासाठीं








चालू असलेली ती धडपड आहे. त्यांच्या चित्रांतील आकृत्या रूक्ष, ओबडधोबड कुरूप, भयानक वासनेने वखवखलेल्या, अप्राप्य, अज्ञेय अशा वास्तविक सत्यासाठीं तळमळणाऱ्या दिसतात ह्याचें कारण हेंच आहे. आत्म्याचा क्षीण आवाज व्यक्त करण्याचें सामर्थ्य त्यांच्यासारख्याच आध्यात्मिक प्रकृतीच्या व प्रगल्भ बुद्धिमत्ता प्राप्त झालेल्या संवेदनशील व भावनाशील व्यक्तीलाच शक्य झालें आहे. इतरानां ते बालिश चाळे वाटले तरीपण आपल्या अस्तित्वाची जाणीव करून देण्याचें महत्कार्य त्या आकृती करतात.

## पूर्णत्वाची धडपड

वास्तविक पाहतां रवींद्रनाथांचें सर्व आयुष्य काव्य, नाटक, कादंबरी, निबंध, ह्या निरनिराळ्या वाङ्मयप्रकाराद्वारे स्वत:चें विचार व्यक्त करण्यांत गेले होते. वाङ्मयाद्वारा त्यांनी अध्यात्मिक, मानवी व सामाजिक रहस्यें उकलून दाखविण्याचा प्रयत्न केला. तरीपण आपल्या जीवनांत अजून कांहीं तरी अज्ञेय आहे असें त्यांच्या हृदयांत कुठेतरी वाटत असलें पाहिजे. म्हणूनच त्यांनी चित्रकलेला हात लावला. त्यांच्या बहुतेक चित्रांत पूर्णत्वाची धडपड स्पष्ट ऐकूं येते.

## अद्‌भुत अनुभव

सृष्टीच्या निर्मितीचें गूढ रहस्य उकलण्यासाठीं त्यानी चित्रकलेला प्रारंभ केला ही एक महत्त्वाची गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. चित्रकलेंत त्यांना अद्‌भुत व आश्चर्यकारक अनुभव आला. रेषा आणि रंग अपूर्णत्वाच्या जाणिवेने अस्वस्थ होऊं लागल्या. ही अस्वस्थता त्यांच्या डोळ्यांत सतत खुंपूं लागली. रेषा आणि रंग यांची युति म्हणजे बाह्य वस्तूंचीं चित्रें नसून तीं स्वत:चींच प्रतिबिंबें आहेत ह्याची अनुभूति त्यांना तीव्रतेने होऊं लागली. त्यांना सुरुवातहि नाहीं, शेवटहि नाहीं, तर निरपेक्ष सत्य सांगणें हाच त्यांचा प्रकृतिधर्म आहे हें त्यांना पटलें.

## स्वत:च्या चित्रकलेंवरील भाष्य

रवीन्द्रनाथांनी जर स्वत:च्या चित्रकलेविषयीं कांहींच उद्‌गार काढले नसते तर त्यांच्या चित्रांचा आस्वाद घेणें हें मोठें जिकीरीचें होऊन बसलें असतें.

रवीन्द्रनाथ म्हणतात "लहानपणापासून मला केवळ समतोलपणाचेंच शिक्षण मिळालेलें आहे. समतोलपणा व सामंजस्य वास्तवतेला आकारास आणतात. जेव्हां माझ्यासमोर कागदावर ओढलेल्या रेघोट्या एखाद्या पापी मनुष्याच्या पश्चात्तापाप्रमाणें आर्त आणि मूक आक्रंदन करूं लागल्या, तेव्हां मी त्यांना अडचणीतून सोडविण्याचा प्रयत्न करूं लागलों. हा प्रयत्न करीत असतांना मला असें आढळून आलें कीं माझ्या चित्रांत सामंजस्य निर्माण झालें आहे."

"या मुक्तिकार्यांत मी एक रहस्य ओळखलें." या अखिल जगतांतील आकृतींच्या विश्वांत नैसर्गिक रीत्या निवड करण्याची सहजप्रवृत्ति आढळते. आणि ज्या आकृत्या सुयोग्य असतात त्याच जगतात. ( survival of the fittest ) याच सुयोग्य ( fittest ) आकृत्यांच्या प्रकृतींतच सामंजस्याचें यथायोग्यत्व समाविष्ट झालेलें असतें. एकमेकांशीं विसंगत असलेल्या हेतुविरहित आकृत्यांमध्यें सुनियोजन करणें, अंतर्गत सूत्रांनी गोवल्या गेलेल्या संपूर्णतेच्या समतोलपणांत त्यांची परिणति होणें म्हणजेच निर्मिति ( Creation ) होय."

वरील उताऱ्यांवरून हें स्पष्ट आहे कीं, रवीन्द्रनाथांच्या मतें सर्व कलांतील प्रमुख साधर्म्य समतोलपणांत सामावलेलें आहे. मर्ढेकरांनी वापरलेला 'भावनात्मक समतानता' ( Emotional Equivalance ) या काव्याच्या व्याख्येची येथें आठवण होणें साहजिकच आहे. टागोर आणि मर्ढेकर ह्यांच्या विचारांतील साम्य उद्‌बोधक आहे. एक मराठींत नवकाव्यप्रवर्तक ठरला तर दुसरा चित्र-








कलेच्या क्षेत्रांत आधुनिक चित्रकलेचा प्रणेता ठरला. असो.

### अर्थापलीकडच्या !

समतोलपणा अंतर्गत वस्तुसाधनांना जिवंत सृष्टींत आणून सोडतो रेषा आणि रंग ह्यांचें काम निव्वळ माहिती पुरविण्याचें नाही. किंवा वस्तूची हुबेहुब नक्कल चितारणें हेंहि त्यांचें कार्य नाही. संपूर्ण सामंजस्य हीच त्यांची खरी प्रेरक शक्ति आहे. त्यानी व्यक्त केलेल्या आकृत्यांना काय "अर्थ" आहे हा प्रश्नच निरर्थक ठरतो. त्या जशा अर्थपूर्णहि नाहीत तशाच अर्थहीनहि नाहीत-तर त्या अर्थापलीकडच्या आहेत.

निसर्गामध्ये आपण नानाविध वस्तु पाहतो याचें कारण त्यांच्याकडे पाहण्याने आपल्याला आनंद होतो. आंधळा मनुष्यदेखील नेत्रांच्या साहाय्या-शिवाय डोळसाप्रमाणें कामें करतांना आपण पाहतोच. अर्थात् रंग व रेषा तत्त्वज्ञानाच्या कल्पना सांगत नाहींत, किंवा जीवनांतील गहन प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न करीत नाहीत. ते आपल्याला एवढेंच सांग-तात कीं आम्ही अस्तित्वांत आहोत. सारांश, रवीन्द्रनाथांचीं चित्रें अमूर्त आत्म्याने मूर्तरूपांत येण्याची प्रक्रिया दाखवतात.

### विश्वांतील निर्मितीची प्रक्रिया

अखिल विश्व हें चैतन्य आणि निर्मिति यांची एकसंघ घटना आहे. ज्या निर्मिती कवि कलाकार, यांच्याकडून झाल्या आहेत त्यांनाच चिरंजीव होण्याचा अधिकार लाभलेला आहे. जिराफाची मान आज आहे तितकी पूर्वी लांब नसली पाहिजे. पण ज्यावेळेस मानेला लांब होण्याची गरज निर्माण झाली त्यावेळेस जिराफाच्या संपूर्ण शरीरांत एक प्रचंड खळबळ माजली असली पाहिजे कीं जेणेंकरून संपूर्ण आत्मशक्तीने जोराचा प्रयत्न करून आपली मान लक्ष्याकडे वाढवली असली पाहिजे. परंतु ज्या क्षणीं क्षुधाशमन झालें त्यावेळेस उरली ती एक फक्त हिडिस विद्रूप आकृति ! विश्वांत निर्मितीची प्रक्रिया याच मार्गाने चालू आहे. उपनिषदांतील "एक-मेवाद्वितीयं। बहुस्यां प्रजायेयेति।" हें वचन रवीन्द्रनाथांच्या चित्रकलेच्या द्वारें प्रत्ययाला येतें. एकाच शक्तीचीं विविध रूपें आढळतात. वेगवेगळीं भासतात तीं कां हा प्रश्नहि सोडवण्याचा प्रयत्न रवीन्द्रनाथांनी केला आहे.

### कुठें काव्य कुठें चित्र !

रवीन्द्रनाथांच्या काव्याचा ज्यांनी अभ्यास केला आहे त्यांना त्यांचींच चित्रें पाहून आश्चर्याचा धक्काच बसतो ! कुठें काव्यांतील सुकोमल, मार्दवयुक्त, मधुर पदावली आणि कुठे आक्रमक, प्रमत्त, विद्रूप, वेड्यावाकड्या पात्याप्रमाणे तीक्ष्ण भासणाऱ्या आकृत्या ! एकाकडे पाहतांच प्रत्यक्ष मांगल्य, पावित्र्य, यांची मूर्तिमंत मूस आढळावी तर दुसरीकडे पाहतांच तीक्ष्ण कठोर, दुःख, दैन्य, भयानकता, क्रूरता व्यक्त करणाऱ्या बंडखोर रेषा ! !

रवीन्द्रनाथांच्या व्यक्तिमत्त्वांत सकृद्दर्शनीं भासणारा हा विरोध, विरोध नसून विरोधाभास आहे. त्यांच्या कांहीं चित्रांतून इच्छेतून मुक्त झालेल्या शांति व स्थिर रेषांचें चित्रण आढळलें तरीपण त्या लयबद्ध रेषांतहि भारतीय कलेची आध्यात्मिक क्षुधा लाव्हा रसाप्रमाणे खळबळाट करतांना आढळते ! याचें कारण रवीन्द्रनाथांची सौंदर्यासंबंधी बदललेली कल्पना.

काव्याकडून चित्रकलेकडे जातांना सुरूपतेने कुरू-पतेला सामंजस्याने असंबद्धतेला, सामावून घेतलें पाहिजे ही तार्किक जाणीव त्यांना झाली ! आपल्या मनांतील अंधप्रवृत्तींना चित्ररूप देण्याच्या प्रयत्नांत त्यांना स्वतःच्या भावनाशील अंतःकरणाशीं सामना द्यावा लागला असला पाहिजे. आल्हाददायक, स्वप्नमय प्रतिमांना विद्रूप बनवतांना त्यांच्या कोमल हृदयांत सहस्र सुया बोचल्यासारखें वाटलें असेल. तथापि काव्य आणि चित्र ह्यांच्यांतील दुवा सांधणारा सांधा त्यांच्या आध्यात्मिक प्रकृतींत आढ-








ळेल ते स्वतः आत्मनिष्ठ प्रकृतीचे चित्रकार होते, लोकांनी जेव्हां त्यांना विचारलें कीं तुमच्या चित्रांचा अर्थ काय ? तेव्हा त्यांनी सांगितलें " I remain silent even as my pictures are."

अर्थात् त्यांनी स्वतःहून आपल्या चित्रांविषयीं कांही बोलण्याचें नाकारलें तरीपण वेळोवेळीं त्यांनी आपल्या चित्रकलेविषयीं जे कांही उद्गार काढले आहेत त्यावरून त्याच्या चित्रांच्या संक्रमणाविषयी बराचसा तर्क करतां येण्यासारखा आहे.

## विकासाचे आठ टप्पे

सुप्रसिद्ध टीकाकार व लेखक डॉ. मुल्कराज आनंद ह्यानी रवींद्रनाथांच्या वेगवेगळ्या चित्रांमधील संगति व विकास दाखवण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांनी टागोरांच्या कलेंतील विकासाचे आठ टप्पे मानले आहेत.

( १ ) Scribbles ( रेघोट्या ) (२) Forms ( आकारत्व ) ( ३ ) Composition ( समन्वय ) ( ४ ) Symbolism ( प्रतीकवाद ) ( ५ ) Crystal forms ( स्वप्नमय प्रतिमा ) ( ६ ) Expressionism ( आशयवाद ) (७) Supernatural (अतींद्रिय) व शेवट (८) Transition ( संक्रमणावस्था ).

( १ ) Scribbles ( रेघोट्या )–रवींद्रनाथांच्या चित्रांची सुरुवात रेघोट्या मारण्यापासून झाली. रिकामा वेळ असतांना किंवा कोणाशीं गप्पा मारीत असतांना त्यांच्या हातांतील पेन समोरील लिखाणाच्या ओळीमधून निर्हेतुकपणें फिरत असे. रेघोट्या मारण्यांत व खाडाखोड करण्यांत कांहींहि अर्थ नसला तरी सुप्त मनावरील दडपण कमी करण्यास ती क्रिया मदत करते. या अवस्थेंत ते निरागस बालकांच्या मनाशीं तादात्म्य पावल्यामुळे बाहेरील स्मृती व अनुभवाच्या पातळीचा थर मनावर ताण पाडतात. त्यांतून सुटण्यासाठीं तालबद्ध रेघोट्या मारून मनावरील ताण कमी करण्याचा प्रयत्न करण्यांत येतो.

( २ ) Forms ( प्रतिमा ) : रेघोट्या मारीत असतांनाच हाताच्या संचलनाने निर्माण झालेला अंतर्गत आवेग हळूहळू अस्पष्ट प्रतिमांचें रूप होऊं लागतो. बिंदुजवळ बिंदु येऊन एक दाट रेषा बनते. व अशा अनेक उभ्या आडव्या रेषांनी त्रिकोण चौकोन बनूं लागून अर्थ धारण करण्यास सुरुवात करतात.

( ३ ) Composition (समन्वय) :– त्यानंतर लयबद्ध प्रक्रियेला सुरुवात होते. पण कलात्मक कौशल्य हस्तगत केलेलें नसल्यामुळे वक्र रेषांऐवजी कोनयुक्त व तोरण आकार तयार होतात पण त्यांना प्रतिमांचा अर्थ नसतो, त्या निराकार असतात.

( ४ ) Symbolism ) प्रतीकवाद :– यानंतर शाई निर्मितीच्या मागे धावूं लागते व अंधुक असा आकार कागदावर उमटूं लागतो.

( ५ ) ( Crystal form ) स्वप्नमय प्रतिमा – या अवस्थेमध्यें टागोरांचीं दिवास्वप्नें मूर्त रूपाने येऊं लागतात. अनाकलनीय कल्पना व आत्मसंतोष आपला प्रभाव गाजवूं लागतात. रात्रीच्या समयीं लहान बालकांच्या डोळ्यासमोर झोपतांना जशा आकृत्या येतात तशा आकृत्या सुप्त मनांतील उन्नत आकांक्षाचा संदेश घेऊन येतात. तीव्र इच्छा लज्जायुक्त, वैभवशील, सुदीर्घ अशा युवतींच्या देवता समाजप्रतिमांशी एकरूप बनतात.

( ६ ) Expressionism ( आशयवाद ) : स्वप्नमय अवस्थेनंतर मनाच्या खिडक्या पूर्णपणे उघड्या केलेल्या आहेत. स्वतःला नेहमी सतावणाऱ्या अमानवी शक्तींमध्ये चित्रकार अंतर्गत जीवशक्तीला संक्रमित करतो. कारण अनिर्बंध इच्छांची भीतिप्रदता चित्रकाराला धोक्याची सूचना देते. म्हणून सरळ, समान्तर समन्वय राखणाऱ्या शक्तिमान् रेषा काढण्यास तो प्रवृत्त होतो. मूलभूत रंगाचें चित्रांतील








आधिक्य दुःख, क्रोध, भीति हे भाव दाखवूं लागतात. चित्रकाराचें कौशल्य पणाला लागतें म्हणून पुनः मागें वळून लयबद्ध रेषांद्वारे कष्टदायक व राक्षसी वाटणाऱ्या कल्पनाप्रत तो उन्नत भावना व्यक्त करतो. अंतर्गत मनाच्या पटावर एकमेकांना आवाहन करणाऱ्या व यौवनाची स्मृति उजळणाऱ्या प्रतिमा स्पष्ट उमटूं लागतात.

(७) (अतींद्रिय) supernatural - टागोरांच्या प्रतिमा साकार रूप धारण करीत असतांनाच अतींद्रिय वातावरणांत प्रतिमेच्या शक्तीने ओढल्या जातात आकार, रेषा, कोन, रंग आप त्याला विश्वाचें भयानकत्व सुचवूं लागतात. भीति आणि दुःख व्यक्त करणारा काळा रंग अधिक गडदपणे दाखवला जातो. त्यामुळे अक्राळविक्राळ रूप धारण केलेल्या सैतानी आकृति क्षणभंगुरत्व व मृत्यु यांची सतत आठवण करून देतात. ह्या सैतानी आकृतींचा प्रयत्न भावनेवर आधारलेलें वस्तुनिष्ठ सौंदर्य व कुरूपतेंत सामावलेलें भयाण सौंदर्य यामधील कृत्रिम तफावत दूर करण्याकडे असतो. मनावर असलेलें जडाचें निरंकुशत्व आपल्याला मान्य करण्याची परिस्थिति येऊन ठेपते. वेदांताच्या छायेपासून चित्रकार दूर पळतो व तंत्रवादाला शरण जातो. पुनश्च स्वप्नांची पुनरावृत्ति होते. प्रखर भावनेतून प्रस्फुट झालेला आर्त भक्तिवाद नाममंत्राच्या काठीचा आधार घेऊन आत्माविष्कार करूं लागतो.

(८) संक्रमण (Transition): शेवटीं चित्रकार संक्रमणावस्थेत येऊन पोहोचतो. इथे वास्तवतेची जाणीव अधिक तीव्रतर आहे चित्रांत दाट रंग उमटूं लागतात. रेषा लयबद्ध बनूं लागतात. आशयवाद पुनः वरच्या पातळीवर येतो. अंतर्गत जीवन हें एक प्रकारचें स्वगत बनतें. चित्रांतून रंगीत प्रतिमांचा प्रवाह वाहूं लागतो. प्राचीन भारतीय कलेंतील रंगाची आसक्ति पुनः मनाला जडूं लागते व चित्रकार आतां उघडपणें बोलण्याचा प्रयत्न करूं लागतो. रेषा वक्र, रंग संवेदनशील, डोळ्याला सुखावणारें गोलाकार नर्तन करणाऱ्या मत्स्याप्रमाणें दिसूं लागतात.

अर्थात् वरील विवेचन हें टीकाकाराच्या दृष्टिकोनांतून केलें गेलें आहे. प्रत्यक्ष रवीन्द्रनाथांच्या चित्रांना शब्दानी स्पष्ट करतां येणार नाहीं. कारण कीं जास्तीत जास्त चांगल्या रीतीनें तीं चित्रें स्वतःच बोलत असतात. स्वतःच्या अस्तित्वाव्यतिरिक्त गहन तात्विक विचार किंवा इतर कांहींहि सांगत नाहींत. जर त्यांच्यांत अंतिम सत्य (अस्तित्व) सांगण्याची कुवत नसेल तर त्यांच्यात कितीहि शास्त्रीय सत्य असलें वा नैतिक आचार सांगितला असला तरी तीं चित्रें विसरलीं जातील किंवा तीं कलेच्या अभिधानास अपात्र ठरतील.

### अभूतपूर्व क्रांति

सारांश, रवीन्द्रनाथांनी चित्रकलेंत जी क्रान्ति घडवून आणली ती अभूतपूर्व अशीच आहे. ती संपूर्णतः मूलभूत असून कोणत्याहि भारतीय वा पाश्चात्य चित्रशैलीचा त्यावर परिणाम झालेला नाहीं. भारताच्या आधुनिक चित्रकलेंत रवीन्द्रनाथांचें स्थान अनन्यसाधारण आहे. चित्रकलेकडे पाहण्याची दृष्टिच त्यांनी बदलवून टाकली. काव्य आणि चित्रकला ह्यांच्यांत त्यांनी एक प्रकारचें प्रकृतिभूत साम्य दाखवून दिलें. हा संबंध दाखवून देण्याचें महनीय कार्य टागोरांनी केलें आहे.










टागोरांच्या चित्रांचें मर्म समजण्यासाठीं त्यांचीं कलाविषयक तत्त्वें जाणून घेणें अगत्याचें आहे. अन्यथा हीं चित्रें शेवटपर्यंत अनाकलनीय विषय म्हणूनच सामान्य लोकांना वाटत राहतील.

रवीन्द्रनाथांच्या चित्रकलेवर खालील ग्रंथ वा लेख प्रसिद्ध झाले आहेत. जिज्ञासूंनी ते अवश्य पहावेत.

(1) Contemporary Indian Painters. V. Venkatacharlu.

(2) Rabindranath Tagore – Lalit Kala Akadami.

(3) Marg. Special Issue. Vol. XIV No. 2 March 1961.

(4) Twelve Paintings by Rabindranath Tagore– Tata Iron & Steel Ltd.

(5) Modern Art in India, - Stella Cramerisch.

(6) India and Modern Art, G. B. Archer.

---

" खाजगी क्षेत्रांतील भांडवल संचयावर अवलंबून राहण्याचें सरकारनें धोरण घोषित केलेलें आहे. हा निर्णय वरकरणी साधा वाटला तरी आजच्या परिस्थितींत तो काडतूस भरलेल्या बंदुकीसारखा आहे. औद्योगीकरणाची गति आणि दिशा आणि त्याच्या कार्याची व्याप्ति ही कमीअधिक प्रमाणांत सरकारनें नियंत्रित केलेलीं असतात. म्हणून स्वायत्त संस्था (कॉर्पोरेशन्स) आणि भांडवलवाले यांच्या बचतीवर राहणें म्हणजे किमतीची पातळी निश्चित करण्यासारखेंच आहे; आणि अशा वेळीं धंद्यांना संरक्षण मिळाल्यानें उद्योगपतींना मोठ्याच प्रमाणावर बचत करतां येते. अशा रीतीनें सरकारच्या धोरणामुळें कांहीं विशिष्ट निवडक भांडवलदारांना विशिष्ट संरक्षित अशा क्षेत्रांमध्यें सुस्थिर होतां येतें, इतकेंच नव्हें तर त्यांचें कार्यक्षेत्र अशाप्रकारें नियंत्रित करण्यांत येतें कीं, नित्याच्या नफ्यापेक्षां त्यांना अधिक नफा होऊन त्यांच्या बचतीमुळें त्यांची आर्थिक शक्ति अधिकच वाढीस लागते "

– डॉ. ध. रा. गाडगीळ

(नागपूर विद्यापीठ दीक्षान्त भाषण)













## पुस्तक-परीक्षण –

### भारतांतील कामगार चळवळीवरील उत्कृष्ट भाष्य *

" तुटपुंजें वेतन, भाववाढ, अधिकाऱ्यांचा जुलूम व गैरवर्तन यांविरोधी निषेधप्रदर्शनांतून कामगार चळवळीचा उगम होऊन आज जवळजवळ चाळीस वर्षे लोटलीं आहेत. प्रारंभीं हा निषेध सौम्य, कित्येकदां अश्रुत आणि हक्क म्हणून नव्हे, तर भीक म्हणून न्यायाकरितां प्रार्थना विनंत्या करणें, अशा स्वरूपाचा होता. पण आस्ते आस्ते एकजूट वाढत जाऊन कामगार संघटित झाले. मजबूत संघटना उभारून त्या संघटनाद्वारां आपल्या असंतोषास वाचा फोडण्यास ते शिकले. अशारीतीनें १९१८ सालीं आरोपण केलेल्या कामगार चळवळीच्या या रोपट्याचें प्रचंड आणि भव्य वृक्षांत रुपांतर झालें आहे आणि हा वृक्ष आज राष्ट्राच्या जीवनांत मानाचें स्थान प्राप्त करून डोलतो आहे. कामगार चळवळीच्या मार्गांत बरेच चढउतार आले. कांहीं काळ उत्कर्षाचा, तर कांहीं अपयशाचा आणि संकटांचा. पण एकंदरींत चळवळ प्रगतिपथावरच राहिली आणि तिची वाटचाल स्थैर्य, सामर्थ्य आणि प्रभाव यांप्रतच होत राहिली. "

वरीलप्रमाणें, पुस्तककर्त्याच्या शब्दांतच भारतांतील कामगार चळवळीच्या वाटचालीचें स्वरूप साररूपानें सांगतां येईल. कामगार संघटनांच्या उदय-विकासाची ही मनोवेधक कहाणी श्री. वसंत भगवंत कर्णिक यांनीं, आपल्या **' भारतीय कामगार संघटना सिंहावलोकन '** ( Indian Trade Unions–A Survey' ) या इंग्लिश भाषेंतून लिहिलेल्या पुस्तकांत कथन केली आहे. १८९० सालीं श्री एन्. एम्. लोखंडे यांनीं स्थापन केलेल्या ' बाम्बे मिल् हॅण्डस् असोसिएशन ' पासून या कहाणीस प्रारंभ होऊन, श्री. एस. एम्. जोशी आदि नेत्यांच्या नेतृत्वाखालील मध्य सरकारी कर्मचाऱ्यांच्या १९६० मधील संपानें तिचा शेवट झाला आहे.

### लेखकाच्या अनुभवाचे बोल

श्री. व. भ. कर्णिकांचें हें पुस्तक म्हणजे भारतीय कामगार चळवळीचा आणि संघटनांचा इतिहास नव्हे. ग्रंथकर्त्याच्या शीर्षकानुसार तें एक सिंहावलोकन आहे. चाळीस वर्षांच्या कामगार चळवळींत सतत तीस वर्षे प्रत्यक्ष जातीनें आणि जागरूकतेनें भाग घेणाऱ्या, तनमनधन अर्पिणाऱ्या श्री. कर्णिकांच्या लेखणींतून उतरलेल्या या सिंहावलोकनाला अर्थातच विश्वसनीयता प्राप्त झाली आहे. आणि एक प्रकारचा जिवंतपणा आला आहे लेखकानें पुस्तक पूर्वग्रह न बाळगतां वस्तुनिष्ठ दृष्टिकोनातून लिहिलें आहे. अहमदाबादेंतील कामगार संघटनेचा गांधीवादी प्रयोग असो, वा श्री. एन्. एम्. जोशी आदि उदारमतवाद्यांचें किंवा कम्युनिस्टांचें कामगार चळवळींतील कार्य असो. स्वतः एकेकाळी सरचिटणीस असलेल्या ' इंडियन फेडरेशन ऑफ लेबर ' चा प्रश्न असो, वा लेखक कार्यकारी मंडळावर असलेल्या ' हिंद मजदूर सभे ' चा प्रश्न असो––या साऱ्या संस्था आणि त्यांतील व्यक्ति यांच्यातील गुणावगुणांचें, दोषनिर्दोषांचें इष्टानिष्टाचें प्रामाणिक, निःपक्षपाती आणि निर्भीड विवेचन लेखकानें केलें आहे. सारी कहाणी म्हणजे लेखकाच्या अनुभवाचे बोल आहेत.

### शास्त्रशुद्ध विवेचन

राष्ट्रीय–आंतरराष्ट्रीय आर्थिक व राजकीय घडामोडी आणि भारतीय कामगार चळवळीचा उदय –विकास यांच्यांतील परस्परांचें नातें आणि कार्यकारणमीमांसा, आर्थिक, राजकीय व सामाजिक घटनांवरील शास्त्रीय विवेचन व अभिप्राय, लेखकाच्या सखोल अभ्यासाची, अनुभवाची आणि विद्वत्तेची साक्ष पटवितात. खरोखर हें पुस्तक म्हणजे भारतीय कामगार चळवळीवरील उत्कृष्ट भाष्य आहे.

भारतांतील कामगार संघटनांचा उदय आणि विकास औद्योगिकदृष्ट्या प्रगत असलेल्या पाश्चात्य राष्ट्रांत ज्या मार्गानें झाला, त्या मार्गाने झाला नाहीं. भारतीय कामगारांत संघटनेचें बीज रुजण्यास फार कालावधि कां लागला ? आर्थिक मागण्यांपेक्षां व्यक्ति व राजकारण यांचांच अधिक प्रभाव कामगार चळवळीवर कां पडला ? ( " Politics is the birthmark of Indian Trade Union Movement " Page 19 ).

---

* इंडियन ट्रेड युनियन्स– ए सर्वे ( इंग्रजी ) ले. व. भ. कर्णिक, प्रकाशक : लेबर एज्युकेशन सर्विस, मुंबई १, किंमत १५ रु.

भूतदया, सेवा, यांतून मूळ धरलेल्या कामगार चळवळीवर कालांतरानें राष्ट्रवाद आणि साम्राज्यशाहीविरोध यांचाच अधिक प्रभाव कां पडला ? या साऱ्या प्रश्नांवर सुरुवातीच्या प्रकरणांतून लेखकानें शास्त्रशुद्ध विवेचन केलें आहे.

## भारतीय कामगार चळवळींतील पांच पंथ

भारतांत खऱ्याखुऱ्या आधुनिक कामगार संघांच्या स्थापनेला पहिल्या महायुद्धाच्या शेवटीं शेवटीं सुरुवात झाली. १९१८ मध्यें, राष्ट्रीय चळवळींतील एक नेते श्री. बी. पी. वाडिया यांनी 'मद्रास लेबर युनियन' या नांवाचा भारतांतला पहिला कामगार संघ स्थापन केला. उद्योगधंद्याबाहेरील व्यक्तीच कामगार संघ उभारण्यास कां कारणीभूत झाल्या याची कारणमीमांसा सांगतांना, श्री. कर्णिक यांनी, कामगारांचे मागसलेपण, निरक्षरता, अज्ञान, नागरीजीवनाचा परकेपणा खेड्यांकडची ओढ, कामगारकामगारांमधील भाषा, चालीरीति, सामाजिक-जीवन यांमधील भिन्नता, इत्यादि गोष्टींचा उल्लेख केला आहे. त्यांच्यामतें भारतीय कामगार चळवळ पांच पथांतून जन्माला आली, वृद्धिंगत झाली आणि अजूनहि तीच परिस्थिति बव्हंशीं कायम आहे. हे पांच पंथ म्हणजे ( १ ) भूतदयावादी ( २ ) राष्ट्रवादी ( ३ ) उदारमतवादी ( ४ ) गांधीवादी ( ५ ) साम्यवादी (communist) पुस्तकाच्या ३-ऱ्या प्रकरणांत या पंचपंथीय अवस्थांचें वेगवेगळें विवेचन करण्यांत आलें आहे. याच प्रकरणांत 'मद्रास लेबर युनियन'च्या मागोमाग, खलाश्यांचे रेल्वे कामगारांचे, गिरणी कामगारांचे, संघ ठिकठिकाणी कसे स्थापन झाले, आणि शेवटी अखिल भारतीय कामगार संघटना ( All India Trade Union Congress ) कोणत्या पार्श्वभूमीवर स्थापन झाली हें सांगितलें आहे. इंडियन नॅशनल काँग्रेसची असहकाराची चळवळ, तिचा कामगार चळवळीवर झालेला परिणाम आणि काँग्रेसचें कामगार चळवळींत पदार्पण याहि गोष्टींचा उल्लेख आहे.

## युद्धोत्तर कालांतील पहिले कायदे

पुढील प्रकरणांत युद्धोत्तर मंदीमुळें, १९२३-१९२७ या कालावधींत कामगार चळवळ कशी मंदावली, या संबंधीं चर्चा आहे. पण याच कालावधींत कांहीं अत्यंत महत्त्वाचे मजूरविषयक कायदे संमत करण्यांत आले. या घटनेस भारतीय कामगार चळवळीचे जनक श्री. नारायण मल्हार जोशी यांचें व्यक्तिमत्त्व आणि कामगिरी कशी कारणीभूत झाली, याचें विवेचन आहे. समत झालेल्या कायद्यांत पुढील महत्त्वाचे कायदे आहेत; इंडियन माइन्स ॲक्ट ( १९२३ ), रिव्हिजन ऑफ फॅक्टरीज् ॲक्ट ( १९२२ ), वर्कमेन्स कॉम्पेन्सेशन ॲक्ट ( १९२३ ) सर्वांत महत्त्वाचा म्हणजे 'इंडियन ट्रेड युनियन्स ॲक्ट' ( १९२६ ); या कायद्यामुळें कामगार संघाना सनदशीर स्वरूप प्राप्त झालें.

## कम्युनिस्टांचें पदार्पण व घरभेदेपणा

याच काळांतील आणखी एक महत्त्वाची घटना म्हणजे कम्युनिस्टांचा कामगार चळवळींतील शिरकाव. लेखकानें पांचव्या प्रकरणांत कम्युनिस्टांच्या कार्याचा आढावा घेतला आहे. १९२८ साली कम्युनिस्टांचा कामगार चळवळीवर विशेष प्रभाव पडला. पण त्याजबरोबर कामगार संघांना वर्गयुद्धाचें शिक्षण देणाऱ्या शाळा बनविण्याचे उघड हेतूनें कामगार चळवळींत प्रवेश करून, रशियांतील कम्युनिस्ट इन्टरनॅशनलच्या ओंजळीनें पाणी पिणाऱ्या कम्युनिस्टांचें कामगार संघटनेंतील कार्य, शेवटीं कामगार चळवळींत फाटाफूट आणि दुही माजविण्यास कारणीभूत झालें असा लेखकानें अभिप्राय व्यक्त केला आहे कम्युनिस्टांच्या घरभेद्या धोरणाचा पुरावा म्हणून त्यांच्या कांहीं विश्वसनीय कागदपत्रांतील उतारे उद्धृत केले आहेत.

१९२९ ते १९४० या कालावधीत, कम्युनिस्टांच्या घरभेद्या धोरणामुळें शेवटीं कामगार चळवळींत दुही माजून लाल कामगार संघांची स्थापना कशी झाली; तदनंतर विशेषतः श्री. एम्. एन्. रॉय यांच्या अनुयायांच्या प्रयत्नानें ही दुही सांधली जाऊन, फिरून एकवार भारतीय कामगार एकाच राष्ट्रीय कामगार संघटनेच्या झेंडयाखाली कसे आले, या घटनांचें विवेचन लेखकानें केलें आहे.

## कायद्याचें अधिष्ठान

याच कालावधींतील आणखी कांहीं महत्त्वाच्या घटना म्हणजे रॉयल ( व्हिटले ) कमिशनची नेमणूक ( १९२९ ) आणि त्यावर कामगार चळवळीच्या








प्रतिष्ठेचें व प्रभावाचें द्योतक म्हणून श्री. एन्. एम्. जोशी आणि श्री. दिवाण चमनलाल यांना देण्यांत आलेलें प्रतिनिधित्व; ट्रेड डिस्प्यूट्स ॲक्ट (१९२९), पेमेंट ऑफ वेजेस ॲक्ट (१९३६), बॉम्बे इंडस्ट्रियल डिस्प्यूट्स ॲक्ट (१९३८), शॉप ॲन्ड एस्टॅब्लिशमेंट ॲक्ट (१९३९), वगैरे कायद्यांचा जन्म; कॉंग्रेस मंत्रिमंडळाची स्थापना (१९३७) आणि त्यामुळें कामगार संघटनेच्या विकासाला मिळालेली अनुकूल संधि; कॉंग्रस सोशालिस्ट पक्षाचें कामगार चळवळींतील पदार्पण (१९३४) या होत. त्यांचें मूल्यमापन लेखकानें यथातथ्य केलें आहे.

## गांधीवादी प्रयोग

अहमदाबादेंतील कामगार संघटनेच्या गांधीवादी प्रयोगावर लेखकानें एक स्वतंत्र प्रकरण लिहिलें आहे. आणि हें योग्यच आहे. इतरत्र कामगार चळवळ हळूंहळूं वाढीस लागली असतांनाच अहमदाबादेंत कामगार संघटनेचा एक आगळाच प्रयोग चालूं होता. १९१८ साली अहमदाबादेंतील गिरण्यांत संपाची लाट उसळली. प्रामुख्यानें महात्मा गांधींच्या मध्यस्थीनें संप यशस्वी होऊन त्यांतूनच मजूर महाजन, म्हणजेच 'टेक्टाइल लेबर ॲसोसिएशन, अहमदाबाद' या गांधीवादी कामगार संघाचा जन्म झाला (१९२०). या संस्थेशीं गांधीजींचा मरेपर्यंत संबंध होता. ही संघटना म्हणजे महात्मा गांधींचें मजूरविषयक तत्वज्ञान आचरणांत आणण्याची प्रयोगशाळाच होती. सत्य आणि अहिंसा हीं त्यांच्या कामगार चळवळीची आधारभूत तत्त्वें. त्यांचा वर्गयुद्धावर विश्वास नव्हता. वर्गसमन्वयाचें त्यांचें धोरण होतें. उद्योगधंद्यांत कामगारांची भागीदारी असावी, या तत्त्वाचा त्यांनी पुरस्कार केला. भांडवलदार कामगारांचे शत्रू नसून विश्वस्त आहेत, असें त्यांचें मत होतें. आर्थिक मागण्यासाठीं झगडणें हेंच केवळ कामगार संघाचें कार्य नसून कामगारांच्या जीवनाचा सर्वांगीण विकास हेंहि त्यांचें ध्येय हवें. नैतिक व बौद्धिक विकासहि त्यांनीं साधला पाहिजे श्री. खडूभाई देसाई यांनी निवेदन केलेलीं गांधीजींच्या मजरविषयक तत्वज्ञानाची मूलभूत सूत्र लेखकाने उद्धृत केलीं आहेत. सुरवातीस हा गांधीवादी प्रयोग अहमदाबादेपुरताच मर्यादित होता तरी पुढें त्याची परिणति प्रथम हिंदुस्तान मजदूर सेवक संघांत आणि नंतर इंटकतर्फे साऱ्या भारतांत पसरली.

कम्युनिस्टांपासून आचार्य कृपलानीपर्यंत साऱ्यांनी या अहमदाबादेच्या गांधीवादी प्रयोगावर उलटसुलट टीका केली आहे; पण श्री. कर्णिकांनी, "गांधींनी अहमदाबादेंत आचरणांत आणलेलीं मजूर-संघटनेचीं तत्त्वें सुरवातीस वादग्रस्त वाटलीं तरी आतां तीं बहुतेक सर्वमान्य झालीं आहेत आणि यापुढें तरी तीं तत्त्वें भारतांत प्रबळ, टिकाऊ आणि जबाबदार कामगार संघटना उभारण्यास आधारभूत ठरावीं," असा निःसंकोच अभिप्राय व्यक्त केला आहे.

## दुसऱ्या महायुद्धानें दिलेली चालना

१९२९ सालच्या मंदीनंतर १९३४ पासून फिरून औद्योगिक विकासाला चालना मिळाली. कामगारांची संख्या वाढूं लागली. परिणामतः कामगार संघांची आणि सभासदांची संख्याहि वाढीस लागली. सप्टेंबर १९३९ ला दुसरें महायुद्ध सुरू झालें. उद्योगधंदे आणखी झपाट्यानें वाढूं लागले. उत्पादन वाढलें. कामगार संघटनेच्या विकासास अनुकूल परिस्थिति निर्माण झाली. संघांची आणि सभासदांची संख्या झपाट्यानें वाढली. कडक इस्त्रीवाला मध्यमवर्गीय नोकरवर्गदेखील याच काळांत प्रथम संघटित होऊं लागला. युद्धामुळें जीवनोपयोगी वस्तूंचे भाव वाढले. काळाबाजार आणि नफेबाजी या दोन सामाजिक रोगांची पैदास होऊन त्यांनी कायमचें ठाण मांडलें! मालकवर्गाला भरमसाट नफा मिळूं लागला. महागाइ-भत्ता आणि नफ्यांतील भागीदारी (Bonus) या मागण्यांसाठीं प्रचंड कामगार आंदोलनें झालीं. कामगार चळवळीच्या इतिहासांत अगदीं प्रथमच मजूर-मालक तंटे मिटवण्याकरितां सक्तीचा लवाद आणि न्यायमंडळें नेमण्याची प्रथा सुरूं झाली. या यंत्रणेमुळें युद्धकालांत तरी कामगारांचा फायदा झाला.

## आणि दुभंगलेली चळवळ!

फॅसिझम विरोधी युद्धाला पाठिंबा देण्याच्या प्रश्नावरून भारतीय कामगार चळवळ फिरून दुभंगली. श्री. एम्. एन्. रॉय आणि त्यांचा रॅडिकल पक्ष यांचें फॅसिझमच्या पराभवानें मानवजातीवरील एक महान् संकट टळेल एवढेंच नव्हे, तर साम्राज्यशाहीचा








अंतकालहि समीप येईल. या कारणास्तव भारताने युद्धाला बिनशर्त सक्रिय पाठिंबा द्यावा, असें ठाम मत होतें. या धोरणानुसार रॉयवादी आणि कामगार चळवळींतील फॅसिझमविरोधी प्रागतिक 'ऑल इंडिया ट्रेड युनियन काँग्रेस'मधून फुटून बाहेर पडले आणि त्यांनी 'इंडियन फेडरेशन ऑफ लेबर' नांवाची मध्यवर्ति कामगार संघटना स्थापन केली (१९४१), युद्धाला पाठिंबा देण्यासाठीं प्रचार एवढेंच या संस्थेचें कार्य नव्हतें, तर खऱ्याखुऱ्या स्वतंत्र कामगार संघटनेचें स्वरूप कसें असावें याचा तिनें आदर्श घालून दिला. भारताच्या आर्थिक विकासाची 'जनता योजना' जनतेपुढें मांडून तिने एक महत्त्वपूर्ण कामगिरी बजावली.

### स्वातंत्र्योत्तर काळ

पुढील प्रकरणांतून लेखकाने युद्धोत्तर आणि स्वातंत्र्योत्तर काळांतील कामगार चळवळीचा आढावा घेतला आहे. बदललेल्या परिस्थितींत स्वातंत्र्योत्साह, उद्योगधंद्यांची वाढ, इत्यादि कारणामुळें कामगार चळवळीचा उत्कर्ष होत गेला. एकाच धंद्यांतील कामगारांच्या अखिल भारतीय स्वरूपाच्या संघस्थापनेला (Federations) उत्तेजन मिळालें. बँका, पोस्ट-टेलिग्राफ, आयुर्विमा कंपन्या, सरकारी कचेऱ्या वगैरे ठिकाणचे कारकून वगैरे नोकर वाढत्या प्रमाणांत संघटित झाले. याच काळांतील अत्यंत महत्त्वाची घटना म्हणजे काँग्रेसच्या पितृत्वानें स्थापन झालेली 'इंडियन नॅशनल ट्रेड युनियन काँग्रेस' अर्थात् 'इंटक'. या संस्थेच्या कार्याची लेखकानें सांगोपांग सविस्तर चर्चा केली आहे. आणि शेवटीं तिचें कार्य, कार्यपद्धति, प्रगति, आणि श्रेष्ठत्व यांबद्दल पूर्वग्रह न बाळगतां, प्रामाणिकपणें प्रशंसा केली आहे. इंडियन फेडरेशन ऑफ लेबर आणि हिंद मजदूर पंचायत यांच्या विलिनीकरणानें स्थापन झालेली 'हिंद मजदूर सभा' ही आणखी एक महत्त्वपूर्ण घटना होय. कामगार संघटना ही वर्गयुद्ध शिक्षणाची शाळा नसून, समाजधारणेच्या दृष्टीनें जबाबदारी स्वीकारणारा, विधायक कार्य करणारा तो महत्त्वाचा सामाजिक घटक आहे. कामगार संघांच्या स्वातंत्र्योत्तर कालांतील या नवीन भूमिकेची जाणीव आलेली संस्था म्हणून हिंद मजदूर सभेचा गौरवपूर्ण उल्लेख लेखकानें केला आहे. कामगार चळवळ फोफावली. पण, दुही कायम राहिली. दुही सांधण्याचे अनेक प्रयत्न व प्रयोग झाले. पण ते निष्फळ ठरले !!

१९५०-१९६१ या कालांतील कामगार चळवळीचा आढावा घेतांना लेखकानं, भारताची राज्यघटना आणि तदंतर्भूत असलेले कामगारांचे हक्क आणि जबाबदाऱ्या, पहिली व दुसरी पंचवार्षिक योजना आणि तदंतर्गत कामगारांचें हितानहित आणि त्यांतून कामगार चळवळीवर झालेले परिणाम यांविषयीं सांगोपांग चर्चा केली आहे.

याच कालावधींतील, चलनवाढ, बेकारी, वाढती महागाई, एतज्जन्य वाढते औद्योगिक कलह, कामगार आंदोलनें, मोर्चे, निदर्शनें, शेवटीं संप, दुसऱ्या पे कमिशनची नेमणूक आणि फिरून १९६१ चा सरकारी नोकरांचा प्रचंड संप या साऱ्या संगतवार घटनांची चर्चा प्रस्तुत ग्रंथांत आहे.

### अलीकडील घडामोडी

अलीकडील घडामोडी या प्रकरणांत लेखकानें, भारतीय मजूर परिषद (Indian Labour Conference) आणि तिचे महत्त्वपूर्ण, हितकारक निर्णय, कामगार विमा योजना, कामगार शिक्षण योजना, उद्योगधंद्यांच्या व्यवस्थायंत्रणेंत कामगारांना स्थान, वगैरे राज्यप्रणीत विधायक योजनावर साधकबाधक चर्चा केली आहे.

१५ व्या आणि सोळाव्या प्रकरणांत लेखकानें अनुक्रमें, एकाच धंद्यांतील कामगारांच्या अखिल भारतीय स्वरूपांचे जोडसंघ (Federations) वा संलग्नसंघ आणि कामगार चळवळीचे आंतरराष्ट्रीय संबंध, या दोन विषयांवर विवेचन करून सिंहावलोकन पूर्ण केलें आहे.

### कांहीं समस्या

पुस्तकांतील सर्वांत महत्त्वाचें प्रकरण १७ वें होय. या प्रकरणांत लेखकानें कामगार चळवळीपुढील समस्या आणि भवितव्य याविषयीं विद्वत्तापूर्ण आणि मौलिक चर्चा केली असून आपले स्पष्ट व प्रांजल विचार प्रगट केले आहेत. प्रश्नांपैकीं कांहीं प्रारंभापासूनचे आहेत तर कांहीं सांप्रतचे आहेत :

(१) भारतांतील औद्योगिक विकासाची मंदगती आणि तज्जन्य मजुरांच्या मागणींतील व पुरवठ्यांतील

विसंगती ( २ ) कामगारांतील मागासलेपणा, अज्ञान, निरक्षरता, ग्रामीण जीवन, खेड्याकडे ओढ, नागरी जीवनाचा परकेपणा इ. ( ३ ) उद्योगधंद्याबाहेरील व्यक्तींचें कामगार चळवळींतील वर्चस्व व नेतृत्व ( ४ ) राजकीय पक्षांची कामगार चळवळींत ढवळा-ढवळ ( ५ ) कामगारांची कामगार-संघटनेविषयीं अनास्था व बेफिकिरी; जाणीवेचा व जागृतींचा अभाव; वर्गणी देण्याबाबत टाळाटाळ ( ६ ) संघटनेपेक्षां विशिष्ट व्यक्तीवर श्रद्धा व अवलंबन ( ७ ) मालकवर्गाचा विरोध आणि संघटनेबाबत अविश्वास ( ८ ) सरकारचें आडमुठें धोरण ( ९ ) लवादपद्धति, न्यायमंडळें यांचें कामगार संघटनेच्या गळयांत बांधण्यांत आलेलें लोढणें— इत्यादि अनेक प्रश्न लेखकानें चर्चिले असून त्यामुळें भारतांतील कामगार चळवळ, पाश्चात्य देशांतील कामगार संघटनांप्रमाणें निरोगी, बलवन्त व सामाजिक जीवनांतील एक स्थिर घटक अशी न राहतां, ती वाढ खुटलेली, खरटी, कमजोर, कशी राहिली याविषयीं विवेचन केल आहे.

लेखकाच्या मतें ही परिस्थिती अलीकडे बऱ्याच प्रमाणांत निवळली असून, मालक व सरकार यांना कामगार संघटनेची आवश्यकता व उपयुक्तता पटूं लागली आहे. कामगार संघटना हा एक आवश्यक व उपयुक्त सामाजिक घटक आहे, हें सर्वमान्य झालें आहे. उद्योगधंद्याबाहेरील व्यक्तींनी कामगार संघटनेच्या विकासाकरितां केलेल्या कार्याचें व त्यागाचें ऋण मान्य करून, अजूनहि कांहीं काळ तरी त्यांच्या साहाय्याविना चालावयाचें नाहीं, असा अभिप्राय लेखकानें व्यक्त केला आहे. याचबरोबर लेखकानें हेंहि मान्य केलें आहे कीं, प्रत्यक्ष उद्योगधंद्यांतील कामगार कार्यकर्त्यांनीच चालविलेल्या संघांची संख्या अलीकडे हळूहळू वाढीस लागली आहे, हें सुचिन्ह होय.

तरीहि एकदरींत, भारतांतील कामगार संघटना अजूनहि मागासलेली व कमकुवत असून गुणात्मक ( qualitatively ) व संख्यात्मक ( quantitatively ) दोन्ही दृष्टया सुधारणेची अतिशय आवश्यकता आहे. यावर उपाय म्हणजे संघांची आर्थिक परिस्थिती सुधारावयास हवी; संघ कार्यक्षम झाले पाहिजेत; कामगारांनी संघटनेबाबत अधिकाधिक गत राहिलें पाहिज, आस्था दाखविली पाहिजे, आणि दैनंदिन कार्यांत अधिक भाग घेतला पाहिजे; राजकीय पक्षांचें वर्चस्व पूर्णपणें नष्ट व्हावयास हवें; आर्थिक मागण्यांसाठीं झगडणें हेंच केवळ ध्येय न राहातां, संघटनेच्या कार्यांत शैक्षणिक, सांस्कृतिक, सामाजिक कार्यक्रमांचा अंतर्भाव हवा.

आजच्या जगांत आणि आजच्या युगांत भारतांतच नव्हे तर इतर राष्ट्रांत देखील कामगार संघटनेसमोर कांहीं नवीन प्रश्न उपस्थित झाले आहेत. त्यांना नवीन भूमिका पार पाडावयाची आहे. आजचें युग योजना-युग आहे. भव्य आणि प्रचंड यांत्रिक व तांत्रिक सुधारणेचें व उभारणेचें अणुयुग आहे. संयोजन ( Planing ), संघटना ( organisation ) आणि स्वातंत्र्य ( Freedom ) या तत्त्वांमधील संघर्ष साधून मानवजातीची प्रगति साधणें कठीण काम आहे. कामगार संघटना ही समस्या टाळूं शकत नाहींत. भारतांत दोन पंचवार्षिक योजना पार पडत आहेत आणि तिसऱ्या योजनेबाबत चर्चा चालू आहे. नियोजनांमुळें औद्योगिक विकासास, परिमाणतः कामगार संघटनेच्या विकासास, भरपूर वाव व संधि मिळणार आहे. पण त्याबरोबर कांहीं धोकेहि अभिप्रेत आहेत. राज्ययंत्राचें ( State ) कामगार संघटनेच्या कार्यक्षेत्रावर आक्रमण होण्याचा धोका आहे; नव्हे, तें घडत आहे. सामुदायिक सौद्याच्या ( Collective Bargaining ) हक्कावरील निर्बंध वाढत आहेत. लेखकाच्या मत योजनाबद्ध अर्थपद्धतीं हें टाळतां येणार नाहीं. पण भारतांतील नियोजन पद्धति ही लोकशाहीवर आधारलेली असल्यामुळें, हे धोके पत्करूनहि, कामगार संघटनांचा, स्वतंत्र आणि बलवान् संघटना म्हणून विकास होण्यास भरपूर वाव आणि संधि आहे. समतोल दृष्टिकोण मात्र हवा.

भारतीय कामगार चळवळीवरील श्री. व. भ. कर्णिककृत भाष्य हें पुस्तक, आर्थिक, राजकीय, सामाजिक तसेंच राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय, घडामोडीचें सखोल शास्त्रीय विवेचन; या घडामोडींची कामगार चळवळीवर होणाऱ्या परिणामांचो मौलिक व मार्मिक मीमांसा, या साऱ्या दृष्टींनी समाजशास्त्राच्या, अर्थशास्त्राच्या विद्यार्थ्यांना आणि विशेषतः कामगार चळवळींतील कार्यकर्त्यांना अभ्यसनीय आहे. पुस्तकांत कामगार संघटनांच्या कार्यपद्धतीविषयीं, संघांच्या










घटनेविषयीं, उद्देशाविषयीं सामुदायिक सौद्याच्या शास्त्राबाबत, मालक-मजूर यांच्यांतील संबंधाबाबत, आणि संघटनेशीं इतर संलग्न असणाऱ्या विषयांबाबत सविस्तर आणि खुलसेवार चर्चा नसली तरी (पुस्तक-कर्त्याचा तसा हेतूहि नव्हता) पुस्तकांत संघाच्या कार्यपद्धतीबाबत, उद्देशांबाबत, मधून मधून विखुरलेले आदर्श उतारे, आकडेवारी इत्यादि माहिती शैक्षणिक-दृष्ट्या महत्त्वाची व उपयुक्त आहे. कामगार शिक्षण-वर्गांना हें पुस्तक मार्गदर्शक ठरण्यासारखें आहे. या पुस्तकाचे प्रादेशिक भाषांतून अनुवाद होणें उचित व आवश्यक आहे. प्रत्येक कामगार-संघाच्या वाचनालयाने हें पुस्तक संग्रहीं ठेवलेंच पाहिजे.

पुस्तकाची भाषाशैली सुबोध व सोपी आहे. विषयांची मांडणी पद्धतशीर आहे. कथनांत क्लिष्टता कोठेंच आढळत नाहीं. त्यामुळें वाचनांत कंटाळा नाहीं.

—म.

---

## मुकुंदराजांची अंबानगर कोणती ?

(लेखक व प्रकाशक—विश्वेश्वर अंबादास कानोले, चिटणीस, गोदातीर इतिहास संशोधन मंडळ, नांदेड, पृष्ठें ९०, मूल्य १॥ रु.)

गेल्या महिन्यांत बीड येथें भरलेल्या मराठवाडा साहित्य संमेलनाचे अध्यक्ष श्री. वि. अं. कानोले यांनीं आतांपर्यंत केलेल्या संशोधन कार्यांत या लहानशा पुस्तिकेचा अंतर्भाव होत असून तिच्या नांवावरून विषयाची कल्पना येईल. मराठीचे आद्यकवि श्री मुकुंदराज यांनीं लिहिलेल्या 'विवेकसिंधू'च्या शेवटच्या अध्यायांतील वैण्यगंगेवरील अंबानगरी कोणती या एकाच मुद्याचा ऊहापोह करण्यांत आलेला आहे. आतांपर्यंतच्या लहानमोठ्या बहुतेक संशोधकांनीं हें ठिकाण म्हणजे मध्यप्रदेशांतील भंडाऱ्याजवळील वैनगंगेकांठचें आंभोर होय असें निश्चित केलेलें मत सप्रमाण खोडून काढून लेखकानें मराठवाड्यांतील मोमिनाबाद किंवा जोगाईचें अंबे हेंच होय असें प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केलेला आहे. विदर्भ आणि मराठवाडा हे महाराष्ट्रांचे दोन विभाग मराठीच्या आद्यकवीवर आपला हक्क बजावित असल्याचा प्रकार येथें कांहींना दिसत असला तरी संशोधनाच्या दृष्टीला या स्थलाभिमानाचें वावडें आहे, म्हणून चुकून देखील तसा आरोप कोणावर करणें गैर होईल. दुसरें असें कीं वरील दोन्ही प्रादेशिक विभागाशीं संबंध नसलेल्या पश्चिम महाराष्ट्रांतील संशोधकांनीं देखील या वादांत भाग घेऊन सत्य शोधून काढण्याचा प्रयत्न केला आहे, आणि कोणी या पक्षाला तर कोणी त्या पक्षाला परंपरागत रूढी म्हणून किंवा संशोधनाचें फळ म्हणून पाठिंबा दिलेला आहे.

श्री. कानोले यांनीं विशुद्ध संशोधनदृष्टि वापरून आतांपर्यंतच्या सर्व संशोधनाची चिकित्सा केली आणि 'विवेकसिंधू' तील अठराव्या अध्यायांतील ३८, ४४ व ४५ या ओव्यांवरून विवाद्य स्थल अंबेजोगाई अशी निश्चिति करून टाकली. मुकुंदराजांच्या काळीं अंबेजोगाई तीर्थक्षेत्रांत गणलें जाई आणि तें स्थान मनोहर आणि वैभवसंपन्न असल्याचा पुरावा मिळतो तसा आंभोरविषयीं कांहीं पुरावा मिळत नाहीं. तसेंच विवेकसिंधूंत उल्लेखिलेली वैण्यगंगा म्हणजे वैनगंगा नसून अंबेजोगाईची वाणगंगा होय, असें श्री. कानोले यांनीं अनेक पुरावे देऊन सिद्ध केलें आहे. प्रस्तावनाकार श्री. न. र. फाटक यांनीं श्री. कानोले यांच्या मताला दुजोरा दिलेला आहे.

## नाथांचा प्रसाद

(लेखक व प्रकाशक श्री. भा. पं. बहिरट, अध्यक्ष पंढरपूर संशोधन मंडळ व श्रीसंतवाङ्मय उपासक मंडळ, महाद्वार, पंढरपूर. पृष्ठें १५०, मूल्य तीन रुपये)

लेखकाचा ज्या दोन संस्थांशीं निकटचा संबंध आहे त्यांपकीं संशोधनापेक्षां वाङ्मय उपासनेच्या दृष्टीनें अभ्यासकांस उपयुक्त म्हणून निरनिराळ्या नियतकालिकांतून पूर्वी प्रसिद्ध होऊन गेलेल्या सोळा लेखांचा हा संग्रह आहे. 'नाथांचा प्रसाद' हा त्यांपैकीं फक्त पहिल्या आणि एका लेखाचा मथळा होय. हे 'नाथ' म्हणजे निवृत्ति-ज्ञानदेवादिकांनीं अनुसरलेला नाथपंथ होय आणि त्यांचा प्रसाद म्हणजे त्यांनीं भक्ति-

मार्गाची प्राकृतांतून, उघडलेली नवी पेठ होय. 'घेणें –देणें सुखचि वरी' करणाऱ्या या पेठेंतून वारकरी संप्रदाय उत्पन्न झाला. ज्ञानदेवें रचिलेल्या पायावर महाराष्ट्रांतील भागवत धर्ममंदिराची उभारणी होऊन तुका त्याचा कळस झाला. प्रेममय भक्तिमार्गाचें महाराष्ट्रांतील संत कवींनीं केलेलें गुणगान हाच बहुतेक लखांचा विषय आहे. तथापि त्याच्याच अनुषंगानें कर्नल जेकब या संस्कृतज्ञ पाश्चिमात्य पंडितानें 'हिंदु लोकांनीं वेदान्तापेक्षां श्रेष्ठ अशा बायबलाचा आश्रय करावा' या मिशनरी थाटाच्या प्रचाराचा एका लेखांत, आणि युरोपांत सतराव्या शतकांत होऊन गेलेल्या स्पिनोझा या ज्यू पंडितानें कमालीचे लोकापवाद सहन करून परंपरेविरुद्ध ज्ञानाची केवढी उपासना केली, त्याचा दुसऱ्या एका लेखांत परामर्श घेण्यांत आलेला आहे.

– श्री.

---

'नवता' हें वाङ्मयीन विकासाच्या क्रांतिकारक अशा महत्त्वाच्या टप्प्यावर अनिवार्यपणानें प्रगट होणारें वेगळेपण होय. नव्या युगाची नांदी गाणारी ही नवता म्हणजे एखाद्या व्यक्तीनें आपल्या स्वैर प्रतिभेतून निर्माण केलल संदर्भहीन वेगळेपण नसतें किंवा स्वतः-कडे स्वतंत्रपणें लक्ष वेधून घेणारी उपरी टूमहि नसते. तसा कांहींसा आभास क्वचित् प्रसंगीं निर्माण झालाच तरी लौकरच ती एक सामूहिक व सामाजिक स्वरूपाची घटना आहे, एकापेक्षां अनेक व्यक्ति त्या पद्धतीनें कार्यान्वित होत आहेत, बदलत्या ऐतिहासिक संदर्भाशीं व व्यक्तिनिरपेक्ष व्यापक घटनांशीं हें वेगळेपण संबंधित आहे, याचा प्रत्यय लौकरच आपणांस येऊं लागतो. हें निराळें वेगळेपण, ही नवता, परंपरेच्या प्रवाहाशीं प्रथम नकारात्मक पद्धतीनें व नंतर अकारात्मक पद्धतीनें संमृद्ध होत असते. नवता ही विशिष्ट वस्तुनिष्ठ संदर्भात व्यक्तिगत प्रतिभाधर्माचा आश्रय करून अनिवार्यपणें प्रकट होते आणि परंपरेला अधिक समृद्ध करून अटळपणानें तिच्यामध्यच मिसळून जाते. परंपरेच्या गतिमान चैतन्यावस्थेचा ती एक सजीव घटक बनते. आणि ह घडत असतांना परंपरेंतील अंतर्गत घटकांच्या मूल्यमापनांत या नवीन अंतर्भूत होणाऱ्या घटकामुळें लक्षणीय बदल पडत असतो. भूतकाळांतील घटना त्याच राहिल्या तरी त्याचा 'अर्थ' बदलतो आणि पुनर्मूल्यनाची जरूरी भासूं लागते.

– विंदा करंदीकर

(मराठवाडा साहित्य संमेलन, बीड.)

---

## लेखकांना विनंति

(१) 'नवभारत' मासिकासाठीं पाठवावयाचे लेख कागदाच्या एकाच बाजूवर शाईनें सुवाच्य लिहावे.

(२) लेखाची पोंच तावडतोब देण्यांत येऊन त्यासंबंधी निकाल सामान्यतः एक महिन्यांत कळविण्यांत येईल. न स्वीकारलेला लेख परत करण्यासाठीं अवश्य तो टपालखर्च पाठवावा.

(३) लेखाची मर्यादा सामान्यतः ४००० शब्दांहून अधिक नसावी. अनेक अंकांतून लेखांक देण्यापेक्षां विशिष्ट मुद्यावर स्वतंत्र लेख लिहिणें बरें.

(४) आशयाला बाध न आणतां लेखाची मर्यादा कमी करण्याचा अधिकार संपादकमंडळाला राहील.

(५) लेखाबद्दल अल्पस्वल्प मोबदला देण्याचें संपादकमंडळानें ठरविलें आहे.

(६) अभिप्रायासाठीं पाठवावयाच्या पुस्तकांच्या दोन प्रती येणें लवकर अभिप्राय देण्याचे दृष्टीनें अधिक सोईचें पडतें.

(७) लेख, संपादकासाठीं इतर कांहीं मजकूर व अभिप्रायासाठीं पुस्तकें कार्यकारी संपादकांचे पत्त्यावर मुंबईस पाठविणें.

# बौद्धागमार्थसंग्रहः

पाली व संस्कृत ] [ मल्य रु. २०

संपादक : डॉ. पी. एल्. वैद्य एम्. ए., डी. लिट. ( पॅरिस )

अखिल भारतीय कीर्तीचे पंडित श्री. वैद्य यांनीं पाली व संस्कृत अशा समग्र बौद्ध साहित्याचें मंथन करून बुद्धचरित्रासंबंधीं व बुद्धाचे उपदेशपर संदर्भ यांत ग्रथित केले आहेत. या ग्रंथाच्या परिशीलनानें बौद्ध धर्माचें वा हीनयान व महायान या दोन्ही बौद्ध संप्रदायांचें सर्वांगीण दर्शन होईल. विद्वान व विद्यार्थी या दोघांना संग्राह्य असा हा संदर्भ ग्रंथ आहे. मूळ पाली व मूळ संस्कृत अशा बुद्धोक्तींचा हा संग्रह आहे.

याचा मराठी अनुवाद महाराष्ट राज्य, साहित्य व संस्कृति मंडळ लवकरच प्रसिद्ध करणार आहे.

बुद्धवंस, चरियापिटक, निदानकथा, ललितविस्तर, सुत्तनिपात, महावग्ग, चुल्लवग्ग, सुमंगलविलासिनी, महापरिनिब्बाण, समन्तपासादिका, दीघनिकाय, संयुत्तनिकाय, अंगुत्तरनिकाय, मज्झिमनिकाय, विसुद्धिमग्ग, बोधिचर्यावतार, मिलिन्दपञ्ह, थेरगाथा, थेरीगाथा, मध्यमकशास्त्र, शालिस्तंबसूत्र, समाधिराजसूत्र, लङ्कावतारसूत्र, सद्धर्मपुण्डरीक या ग्रंथांतील बुद्धचरित्र, भिक्षुभिक्षुणीशिक्षण, धर्म, प्रकीर्णक व संगीति अशा पांच विषयावरील संदर्भ यांत घेतले आहेत.

मिळण्याचें ठिकाण —

प्राज्ञ पाठशाळा मंडळ, वाई ( सातारा )










# त्यांचे स्वप्न

साकार व्हावे म्हणून ...





हा तरुण मुलगा भारताच्या स्वप्नांचें
प्रतीक आहे. तो अध्ययन व परिश्रम करण्यास अतिशय
उत्सुक आहे. त्यामुळें तो राष्ट्रीय पुनर्रचनेच्या
कार्यांत सक्रीय भाग घेऊं शकतो. त्याचे आईवडिल
सूज्ञ आहेत. आपल्या मुलाचे स्वप्न साकार व्हावे म्हणून
त्यांनीं अल्प बचत योजनेंत रक्कम गुंतविली आहे.

## अल्प बचत योजनेंत

## रक्कम गुंतवा

तपशीलवार माहितीसाठीं लिहा :-
उपसंचालक, अल्प बचत योजना बृहन्मुंबई, सचिवालय, मुंबई.
जिल्ह्याच्या ठिकाणांसाठी कलेक्टर
तालुक्याच्या ठिकाणांसाठी मामलतदार/महालकरी.

प्रकाशन संचालक, महाराष्ट्र सरकार, मुंबई











अनुक्रमणिका